


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)






महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

'नवी क्षितिजे' हे मराठीतील एक महत्त्वाचे नियतकालिक (त्रैमासिक) असून ते सद्यस्थितीत कार्यरत नाही. संस्थेच्या उपरोक्त प्रकल्पातंर्गत 'नवी क्षितिजे' ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करता येणे शक्य असल्याने सदर नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून संस्थेच्या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यासाठी राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सदर नियतकालिकाचे संपादक व मालक स्मृतिशेष श्री. नाना जोशी ह्यांच्या कन्या श्रीमती शर्मिला जोशी ह्यांना विनंती करण्यात आली होती.

सदर विनंतीस श्रीमती शर्मिला जोशी ह्यांनी मान्यता दिल्यामुळे आणि सदर नियतकालिकाचे अंक उपलब्ध करून दिल्यामुळे 'नवी क्षितिजे' ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देणे शक्य होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे/ नियतकालिकांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था, मुंबई आणि नवी क्षितिजे संपादक-मंडळ यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे, कलावंतांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्व राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे नसतील.

अनुक्रमणिका

# नवी क्षितिजे

धर्म संस्थापक महंमद
मॅक्झिम् रॉडिन्सन
अनुवादक–माधव लिमये.

वर्ष - ९
अंक - ३६

फ्राईड सायकोॲनलिसिस–
शास्त्र आणि कला
– विश्वास पाटील

अनुक्रमणिका



३६

# नवी क्षितिजे

संपादक
नाना जोशी
विश्वास पाटील
रचना
पामार्ट
मुंबई २८
पत्र व्यवहाराचा पत्ता
विश्वास पाटील
१३ पुष्प कुंज, पालखी वाडी
काशिनाथ धुरू रोड
मुंबई २८
मुद्रक व प्रकाशक
शुभांगी जोशी
३२९, वि. प. रोड, मुंबई ४
वार्षिक वर्गणी
रु. १२-५०

मुद्रण स्थळ :
ना. दा. चावरे
नागरिक छापखाना
२३० व्यंकटपुरा, सातारा.

## अनुक्रमणिका



किमत ५ रु.

## संपादकीय

नवी क्षितिजेचा छत्तिसावा अंक आपल्या हाती देताना आम्हाला अत्यंत आनंद होत आहे. तेहतीस ते छत्तीस श्रेणीतला हा शवटचा अंक या अंकानंतर सदतीस-चाळीस श्रेणी सुरू होईल. आमच्या वर्गणोदारानी कृपया सदतीस-चाळीस श्रेणोची वर्गणी लवकरात लवकर धाडावी ही विनंती. छत्तिसाव्या अंकाबरोबर नवी क्षितिजेला नऊ वर्षे पूर्ण होत आहेत.

गेल्या नऊ वर्षांत आम्ही अनेक विषय हाताळले हे आमच्या कायम वाचकांच्या ध्यानात असेलच. आम्ही अस्तित्ववादाच्या तत्वज्ञानाबद्दल विस्ताराने छापले. तसेच झुंडीचे मानसशास्त्र, मानवी आक्रमक प्रवृत्ती, कार्ल मार्क्स, हिटलर, आधुनिक मनुष्याला स्वतःबद्दल आणि जगाबद्दल वाटणारा दुरावा, क्लॉड लेव्ही स्ट्रॉस, भारतीय एकपक्षीय लोकशाही, औद्योगिक राज्य या आणि अशाच इतर कितीतरी विषयांवर आमच्या मगदुराप्रमाणे विचार आम्ही प्रसिद्ध केले आहेत. हे सगळे साहित्य आपणाला देताना आम्ही फक्त एक विचार आमच्या डोळ्यापुढे सतत कायम ठेवला होता. तो म्हणजे जे साहित्य आम्ही आपणाला देत आहोत ते विचाराला चालना देणारे आहे की, नाही ? त्यांत काही ना काही तात्विक संकल्पना चर्चिली गेली आहे की, नाही ? आम्ही आमचा विचार कितपत राबविला हे आपण ठरवायचे आहे असो.

या अंकात 'धर्मसंस्थापक मुहमद' माधव लिमये आणि फ्राइड सायकोॲनलिसिसशास्त्र आणि कला-विश्वास पाटील हेच मागील लेखमालांचे पुढील भाग आले आहेत.

संपादक
४-७-८२

अनुक्रमणिका



मॅक्झिम रॉडिन्सन कृत

## मुहमद

### प्रकरण ३ रे चालू

(मागील अंकावरून)

पाचव्या शतकाच्या अखेरीस जगाचा अंत होणार असे यहुद्यांचे भाकीत होते. त्या शतकाच्या अखेरीस जगबुडीचे नक्की वर्ष सांगण्याची वेळ आली त्यावेळी ५३१ या वर्षाचा हवाला देण्यात येऊ लागला. परंतु ही नंतरची तारीखही पुढे ढकलावी लागली. परंतु साम्राज्या साम्राज्यांतील महान युद्धे आणि त्याच्या जोडीला यहुदी लोकांचे नव्याने सुरु झालेले उठाव ही जगबुडी येणार हे दर्शविणारी हमखास चिन्हे होती. लोक असे म्हणू लागले की, 'ज्या-वेळी राज्ये आपापसात लढाया करु लागलेली दिसू लागतात त्यावेळी 'मसीहा' अवतरणार असे पक्के समजावे. असे घडून येणार हे नक्की. कारण अब्राहमच्या वेळी असेच घडले होते. ज्यावेळी एक राष्ट्र दुसऱ्या राष्ट्राविरुद्ध युद्धात उतरले त्यावेळी अब्राहमचा पुनरुद्धार घडून आला होता" जगबुडीपूर्वी रोमन आणि पर्शियन यांच्यात प्रचंड युद्ध होणार असे भविष्य बऱ्याच धर्म ग्रंथातून वर्तवि-ण्यात आलेले होते. जुन्या करारातही यासंबंधीचा उल्लेख आहे. अशा परि-स्थितीत वरील घटना लवकरच घडून येणार याविषयी शंकेला जागा आहे असे तरी कोणाच्या मनात कसे यावे ?

ज्यावेळी अशी परिस्थिती निर्माण होते त्यावेळी आता लौकरच ती महान आपत्ती येणार असल्यामुळे पापी लोकांनी ईश्वराशी सख्य करुन पुनरुत्थानाच्या महान दिवसासाठी सिद्ध रहावे असे आवर्जून सांगणारे अनेक लोक भेटतात. अरबांतही अशा प्रेषितांचा तुटवडा नव्हता. याबाबतीत दोन नावे डोळ्यापुढे येतात ती म्हणजे खालिद इब्न सिनान आणि कोणी एक हंझाला इब्न सफवान यांची त्यापैकी खालिद इब्न सिनान याला अब्स या टोळीकडे पाठविण्यात आले होते..परंतु अरेबियाच्या बरोबर मध्यावर असलेल्या यमामा मधील बानू हनीफा टोळीतील मस्लामा हा त्या सर्वात प्रख्यात होता. मुसलमान परंपरे-





नुमार तो यशस्वी होई तो केवळ हातचलाखीमुळे, आणि आपल्या रूपाने प्रेषिताचा अवतार होणार आहे असे त्याने फार उशिरा जाहीर केले म्हणुन त्याची टवाळीच झालेली दिसते. परंतु अरब इतिहासकारांनी जी माहिती संग्रहित करुन ठेवली आहे त्यावरुन परिस्थिती उलट दिसते. मस्लामा आपल्या ईश्वराला रहमान–म्हणजे दयाळू या नावाने संबोधतो आणि त्याच्या नावाने उपदेश करतो. दक्षिण अरेबियातील लोकांनी यहुद्यांच्या देवाला त्याचप्रमाणे ख्रिस्ती धर्मातील त्रिमूर्ती पैकी ( हिब्रू आणि अरमॅनिक भाषेनुसार ) पिता म्हणून ओळखल्या जाणाऱ्या देवालाही हेच नाव दिले असल्याचे आता हाती आलेल्या कोरीव लेखांवरुन आपल्याला माहित झालेले आहे. मस्लामाला देखील त्याच्या देवाच्या नावावरुन रहमान असे म्हणत असे सांगितले जाते. महंमदाने आपले ज्ञान रहमान नावाच्या यमामामधील कोणा एका माणसा–कडून मिळवले असल्याचा आरोप महंमदावर केला जात असे. काहीजण असेही प्रतिपादन करतात की, मस्लामाने आपल्या कार्यास महंमदाच्या आधी प्रारंभ केला होता आणि नंतर आपली ही अधिकार क्षेत्रे वाटून घेऊ अशीही महंमदाला सूचना केली होती. यावरुन असा निष्कर्ष निघतो की, त्या काळात महंमदा–प्रमाणे दुसराही एक प्रेषित अरेबियात आपली शिकवण देत होता व त्याच्या कल्पना महंमदाच्या कल्पनांशी मिळत्या जुळत्या होत्या असा पुरावा मिळतो.

महंमदावर या सर्वांचा परिणाम घडून आला असणारच. ज्यामुळे त्याच्या जीवनाला अर्थ कसा प्राप्त होईल आणि धनवान आणि सामर्थ्यवान लोकांचा हमखास बदला कसा घेता येईल याचा त्याला ध्यास लागलेला होता यहुदी आणि ख्रिस्ती धर्मीयांनी प्रसृत केलेल्या नव्या कल्पनांचा आधार काय होता ते त्याला माहित झालेले होते. व त्यांच्या एकेश्वरी प्रवृत्तीकडे त्याचा कल होता. परंतु तो अरब होता आणि अरबच राहिला. आपल्या अरब बांधवां–पासून स्वतःची फारकत करून घेण्यास तो तयार नव्हता. नुकतेच घडून आलेले सामाजिक बदल आणि त्यावेळची नैतिक दुरावस्था यामुळे घडून आलेले भया–नक दुष्परिणाम याची त्याने धास्ती घेतली होती. त्याला स्वतःला बसलेले दारिद्र्याचे आणि अवहेलनेचे चटके यांची स्मृती त्याच्या मनात ताजी असल्यामुळे या सामाजिक बदलामुळे ज्यांना हाल सोसावे लागले होते त्याच्या परिस्थितीची तो कल्पना करू शकत होता. जगात घडून येत असलेल्या उलथा पालथीमुळे तो भयचकित होऊन गेला होता आणि ही सर्व जगाचा अंत जवळ आल्याची व नव्या युगाची सुरवात होण्याची तर चिन्हे नसतील असे त्याच्या मनात येऊ लागले. प्रेषितांचा अवतार होतो, आणि मानवाने पश्चाताप

करावा म्हणून बोलावून घेण्यासाठी ईश्वराने आपल्याला पाठवले आहे असा त्यांचा दावा असतो हे त्याने पाहिलेले होते. स्वाभिमान आणि त्याच्या जोडीला स्वतःच्या योग्यतेसंबंधीची यथार्थ जाणीव यामुळे अखेरच्या दिवसांच्या नाटचात आपल्याला स्वतःलाही काही भूमिका पार पाडावी लागणार असेल असे विचार त्याच्या मनात घोळू लागले. आणि त्याच्या नैसर्गिक प्रवृत्तीमुळे महान जलप्रलय होऊन त्याला ईश्वरी इच्छेचा जो साक्षात्कार होणार होता त्यासाठी त्याच्या मनाची तयारी झाली.

## प्रकरण ४ थे

# धर्मपंथाचा उदय

अशा तऱ्हेने महंमदाच्या आध्यात्मिक विकासाला अनेक बाह्य शक्तींची जोड मिळत गेली व त्यात दुसरा अनेक बाबी समाविष्ट होत गेल्या. परंतु त्याचबरोबर तो एका निराळ्याच प्रकारच्या आध्यात्मिक संघर्षात गुरफटलेला होता. त्यासाठी हृदयस्थ प्रासादाची अनंत दालने ओलांडावी लागत होती. सेंट टेरेसा ऑफ अॅव्हिलाच्या शब्दात सांगावयाचे तर हा प्रासाद सर्वस्वी एका हिऱ्याचा किंवा अत्यंत विशुध्द अशा स्फटिकाचा बनवलेला आहे. अगदी सुरवातीच्या अवस्थेत त्याचे डोळे त्या प्रासादाच्या बरोबर मध्याकडे म्हणजे ‘त्या प्रासादात राजा ज्या ठिकाणी राहतो त्या जागेकडे लागून राहिलेले होते.’

मक्केच्या ईशान्येला काही मैल अंतरावर असलेल्या हिरा टेकडीवरील गुहेत काही काळपर्यंत एकांतवासात राहण्यास त्याने केव्हा पासून सुरवात केली ते निश्चितपणे आपल्याला माहित झालेले नाही. सौंदर्यहीन आणि रूक्ष अशा पठारावर ती गुहा होती. चार्लस ह्यूबरने आपल्या मृत्यूच्या थोड्याच दिवस आधी त्या जागेचे वर्णन करताना असे लिहून ठेवले आहे की, तेथील रंग देखील कसे उदास आणि कंटाळवाणे भासत. धागेरड्या पिवळ्या रंगापासून तो तशाच फिकट तपकिरी आणि मातकट राखी रंगाव्यतिरिक्त अन्य रंग छटा तेथे कधी दिसायच्या नाहीत. कोणी चिंतनाला बसले तर त्याचे चित्त चाळवले जाईल अशी एकही गोष्ट तेथे नव्हती. अशा तऱ्हेची एकांतवासात जाऊन बसण्याची सवय महंमदाने यहुदी आणि ख्रिस्ती तपस्व्यांपासून स्फूर्ती घेऊन लावून घेतली होती. काही हनिफांनी बहुधा त्यांचे अनुकरण करून अशा प्रकारच्या

रात्रीच्या चिंतनाला वाहून घेतले असावे. जीन गर्सनचे शब्द उधृत करावयाचे तर रात्रीची वेळ ही अधिक शांत, जिव्हाळा निर्माण करणारी आणि या जगाच्या फसव्या वैभवाची भुरळ न पाडणारी अशी असल्यामुळे चिंतनासाठी रात्रीचा समयच सर्वांत सोयीचा असतो.

महंमदाला काय हवे होते? तो कशाचा शोध घेत होता आणि नेमके काय करीत होता? यावर प्रकाश टाकणारे विश्वासार्ह असे लिखाण उपलब्ध नाही. परंतु अल्ला आणि त्याच्या आविष्कारासंबंधी महंमदाने जे जे म्हणून ऐकले होते त्यामुळे तो आर्त बनला होता, आणि कोणत्या ना कोणत्या स्वरूपातील आध्यात्मिक सत्य शोधून काढण्याच्या पाठीमागे लागलेला होता. पण हे सत्य म्हणजे तरी त्याला काय अभिप्रेत होते? वाळवंटातील ख्रिस्ती आश्रमवासियांप्रमाणे रात्रीचा अंधार उजळून टाकणाऱ्या दिव्याच्या प्रकाशात धर्मग्रंथांचे पठण करीत राहण्याची व डोळ्यात आसवे आणून आणि मोठमोठ्याने विलाप करीत बसण्याची कल्पना अरबी कवींना भारून टाकीत असे. ईश्वराची ओढ लागलेल्या मूर्तीपूजकांना देखील त्यांचे अनुकरण करावेसे वाटले असावे याबाबतीत पुढे मेसापोटेमियातील अरबेलाच्या बिशपचे उदाहरण त्यांच्या डोळ्यासमोर होतेच. बाप्तिस्मा होण्यापूर्वी म्हणजे ख्रिस्ती धर्माची दीक्षा घेण्यापूर्वी तो देखील असाच गिरीकुहरात जाऊन जगाचा मायावीपणा आणि क्षणभंगुरता यासंबंधी चिंतन करीत बसत असे.

तेव्हा महंमद हा अल्लाकडून ज्ञानप्राप्ती व्हावी म्हणून निश्चितच त्याच्या संबंधीचे चिंतन आणि प्रार्थना करीत असावा. आणि यासंबंधी अत्यंत विश्वासार्ह अशी जी हकीगत आपल्याला ठाऊक आहे—आपली सगळ्यात आवडती बायको जो आयेशा तिलाच स्वतः महंमदानेच मोठ्या विश्वासाने सांगितले अशी तिची पूर्वपीठीका असल्याचे सांगितले जाते, त्या हकीगतीप्रमाणे—नंतर एक दिवस असा उजाडला की, त्या दिवशी काही तरी घडले. म्हणजे ईश्वराच्या प्रेषिताला त्याचा साक्षात्कार होण्यास प्रारंभ झाला. आयेशा पुढे असे सांगते की, दिवस फुटावा (फलक अस. सुबह्) तसा त्याला साक्षात्कार झाला. अरबी भाषेत फलक अस सुबह या शब्दाचा अर्थ ज्या देशात सकाळचा किंवा संध्याकाळचा संधिप्रकाश नसतो, अशा देशातील अंधार सुर्योदयामुळे एकदम नाहीसा होणे असा होतो. अशाच तऱ्हेने त्याला एकदम 'सत्' चे दर्शन घडले. ती भावना सर्वव्यापी आणि जणू कोणाचे तरी प्रत्यक्ष अस्तित्व जाणवल्यासारखी होती; 'ईश्वर आत्म्याच्या ठिकाणी अशा प्रकारे वसत असतो की, ज्यावेळी तो प्रकट होतो त्यावेळी ईश्वर हा आत्म्यात आहे आणि आत्मा हा ईश्वरमय आहे (म्हणजे



अनुक्रमणिका

ईश्वर आणि आत्मा एकरूप झालेले असतात ) याविषयी शंकेला कसलीही जागा रहात नाही.' ( टेरेसा ऑफ अॅव्हिला. ) का हा नुसताच कल्पनेचा खेळ होता? या बाबत पुन्हा एकदा टेरेसा ऑफ अॅव्हिलाचे प्रतिपादन उधृत करावयाचे तर आत्मा हा चक्षुरिंद्रियाच्या सर्वस्वी अतीत अशा असतो. प्रत्यक्ष दर्शनाची त्याच्याबाबतीत अपेक्षाही नसते. ज्यावेळी आपल्याला ईश्वराच्या संपूर्ण मूर्तीचे अचानक साक्षात दर्शन घडते त्यावेळी सर्व इंद्रिये भारावली जावून भीतीचा उद्भव होतो आणि लगेच सुखद अशा शांतभावात त्याचे रुपांतर होते. ज्यावेळी सेंट पॉल धरणीवर नि:चेष्ट पडला त्याच क्षणी वातावरणात प्रचंड वादळ आणि घालमेल निर्माण झाली होती. अशा तऱ्हेने आपण ज्या आंतरीक जगाबद्दल बोलत आहोत त्यात प्रथम प्रचंड खळबळ माजते आणि नंतर क्षणार्धात मी वर म्हटल्याप्रमाणे पुन्हा एकदा शांतता पसरते.

आयेशा पुढे कथन करते ' तेव्हा पासून त्याला एकांतवास आवडू लागला. हिरा टेकडीतील एक गुहा ही त्याची एकांतवासाची जागा होती. आपल्या घरी परत येण्यापूर्वी कित्येक रात्री तो एकांतवासाच्या पवित्र ठिकाणी घालवीत असे. त्यानंतर तो घरी परत येवून पुन्हा तितक्याच कालावधीकरता आटापाणी घेऊन परत जात असे' हे असे बरेच दिवस चालले असावे. नंतर एकादिवस अगदी अचानक आणि अनपेक्षितपणे ईश्वराचा तो महान संदेश आला.

एक दिवस कोठलीही पूर्वसूचना न मिळता त्याला ( ईश्वराचा ) आवाज ऐकू आला. काहीतरी लोकविलक्षण आपणाकडे येत आहे अशी अगदी स्पष्ट जाणीव त्याला त्यादिवशी प्रथमच झाली असणार. मक्केतील त्या भक्तिप्रवण रहिवाशाला त्याचे काय परिणाम घडून येणार यासंबंधी दुसरे काही सुचणे शक्यच नव्हते. अरबी भाषेत त्याला तीन शब्द ऐकू आले. त्या तीन शब्दांमुळे पुढे सारे जग हादरून जाणार होते ते शब्द होते.

' तू देवदूत आहेस '

स्वत: महंमदाने तो वृत्तांत कथन करताना असे सांगितल्याचे म्हणतात की, ' मी उभा होतो, परंतु मी गुडघ्यावर पडून ओणवा झालो त्यावेळी माझ्या छातीचा वरचा भाग थरथर कापत होता. मी खादिजाकडे गेलो आणि म्हणालो, माझी भीती जाईपर्यंत " मला पांघरूण घाल! पांघरूण घाल! "

हा किंवा या नंतर होत गेलेले साक्षात्कार कालानुक्रमाशी सुसंगत आहेत किंवा नाहीत ते आपल्याला निश्चितपणे सांगता येणार नाही. परंतु पुढेपुढे त्यांचे स्वरूप अधिकाधिक स्पष्ट होत गेले हे निश्चित आहे. अतिभौतिकतेच्या अस्तित्वाची भावना पुढे सोप्या सोप्या शब्दपंक्ती उच्चारल्याची जाणीव आणि



अनुक्रमणिका

ती ऐकल्याचा चक्षुरिंद्रीय भास यांच्या जोडीला त्यानंतर स्पष्ट अर्थ असलेले लांब लचक शब्दांतील क्रमवार संदेश येवू लागले. त्यात मधून मधून अडथळे येत आणि आधी येऊन गेलेल्या संदेशांची काही वेळा पुनरुक्ती असे यात वाद नाही. परंपरागत कथांमधून त्याचा उल्लेख आढळतो. सुरवातीला अचानकपणे होणारे हे दैवी प्रगटीकरण आणि ज्या अज्ञात शक्तीकडून ते होत असे त्याद्वारे ते अनुभवणाऱ्याला जे संदेश मिळत असत त्यामागे कोणते गूढ हेतू असावेत यासंबंधी भीतीची भावना असे. परंतू पुढे नियतीने आपल्यावर विशिष्ट जबाबदारी सोपविली आहे ही कल्पना जसजशी महंमदाच्या अंगवळणी पडू लागली तसतशी त्याबाबत आपणाकडून काही चूक तर होणार नाही ना याची त्याला अतिशय धास्ती वाटू लागली. विशेषत: अति भौतिकाचे प्रकटीकरण काही काळबंद झाले त्यावेळी तर ईश्वराने आपणाकडे पाठ तर फिरवली नसेल ना अशी शंका त्याच्या मनात येऊ लागे. अशा तऱ्हेच्या भीतीची ही मानसिक अवस्था सर्वच गूढवाद्यांच्या वाट्याला आलेली आहे. टेरेसाने असे लिहून ठेवले आहे की, ज्याक्षणी आत्म्याला शब्द ऐकू येतो, त्यावेळी तो ईश्वराचाच असतो. परंतु असा आवाज ऐकल्यानंतर मध्यंतरी बराच काळ लोटला आणि आत्म्यावर झालेला त्याचा पहिला असर नाहीसा झाला, की आम्हाला शंका वाटू लागते आणि एखाद्या भूतपिशाच्याने तर आपल्याला चकवलेले नाही ना किंवा हा सारा आपल्या कल्पनेचा तर खेळ नसेल ना असे वाटू लागते. तरीही ज्याक्षणी तो शब्द ऐकू येतो त्यावेळी मात्र कसलीही शंका नसते आणि त्यापाठीमागील सत्य टिकून रहावे असे अत्यंत तीव्रतेने वाटत असते' महंमद हा अत्यंत कष्टी झाला होता. त्या अवस्थेत असताना तो म्हणतो, डोंगर माथ्यावरून स्वत:ला खाली झोकून द्यावे असा विचार माझ्या मनात आला. तो डोंगरमाथा म्हणजे कदाचित हिराच्या टेकडीच्या टोकाला असलेला खोल निसरडा कडा असावा.

पुढे त्याला जो साक्षात्कार होत असे आणि लोक जो मानायला तयार नसत तो कसा खरा आहे ते सांगणारा आणि त्याचे वर्णन करणारा प्रत्यक्ष ईश्वराचाच आवाज त्याला ऐकू आला. ते शब्द असे होते :

तुझा सहकारी चुकलेला नाही, किंवा तो वाट चुकून भरकटलेलाही नाही,
तो जे बोलतो ते त्याच्या मनाला येते म्हणून नव्हे.
त्याला तसे सूचित केले गेलेले असते,
अत्यंत सामर्थ्यशाली असलेल्याने ते त्याला शिकविलेले असते.
तो सर्वज्ञ असून सरळ ताठपणे
क्षितीजाच्या सर्वोच्च भागावर उभा असतो.

तेथून तो नजीक येतो आणि तो इतका खाली येतो की,
दोन बाणांच्या टप्यात किंवा त्याहूनही जवळ येतो.
नंतर ज्याचा साक्षात्कार झाला ते त्याने आपल्या सेवकाला सूचित केले ..
दुसऱ्या झेपेत त्याने त्याला
अल्–मुंतहाच्या बोरीच्या झाडापाशी पाहिले
त्या झाडाजवळ अल्–मा " याची बाग आहे. "
बोरीचे झाड ज्याने झाकले गेलेले असते त्याने ते झाकले गेलेले होते.
तुझ्या सहकाऱ्याची त्याची दृष्टी सैरभैर झाली नाही किंवा तो दुसरी-
कडेही वळली नाही :
त्याने आपल्या प्रभूचा एक महान चमत्कार पाहिला (कुराण iii , १–१८)
त्याच प्रमाणे पुन्हा :
रात्र पडल्यानंतर
आणि चैतन्यदायी जीवन सुरू होते अशा सकाळी हा शब्द खरोखरी त्या
महान दूताचाच आहे,सामर्थ्यवान, त्याच्या सिंहासनाशेजारी स्थानापन्न झालेला
तो श्रद्धावान त्याच्या आज्ञांचे पालन करतो.
तुझा सहकारी झपाटलेला नाही.
त्याने स्वच्छ क्षितिजावर त्याला पाहिले. (कुराण xxxi १७–२३)

मुस्लीम परंपरेनुसार महंमदाला ( ईश्वराचे ) जे दर्शन घडले ते सर्वश्रेष्ठ देवदूत जो गॅब्रियल (अरबी भाषेत जिब्रिल) किंवा सिराफिलच्या रूपात झाले होते. महंमदाला पहिल्या प्रथम त्याची ओळख पटली नसण्याची आणि तो अल्लाने पाठविलेला कोणीतरी सामर्थ्यशाली देवदूत असावा असेच त्याला वाटले असण्याची शक्यता आहे. प्रत्यक्ष अल्लामधूनच त्याचा उद्भव झालेला असावा, ख्रिस्ती धर्मात चित्‌शक्ती, हा शब्द किंवा ईश्वराचे निश्वसित म्हणून ज्याचा उल्लेख केला जातो तशा प्रकारचा हा काही तरी अमूर्त भाव असावा असे त्याच्या मनात आले असणे शक्य आहे.

महंमदाने स्वतःच कथन केलेल्या वृत्तांतानुसार शेवटी अशी वेळ आली की, ती सर्व शक्तीमान सत्ता त्याला सांगती झाली " म्हण ! " मी म्हण " मी काय म्हणू ? " तिने मला धरले आणि तीन वेळा मला इतक्या यातना दिल्या की, शेवटी मी अगदी गळून गेलो. नंतर ती म्हणाली ' म्हण ज्याने तुला निर्माण केले त्या तुझ्या ईश्वराच्या नावाने ...... " मी त्याप्रमाणे म्हटले ' आणि त्यावेळी त्याने जे शब्द उच्चारले ते कालानुक्रमाने घेतले तर तेच कुराणातील पहिले शब्द ठरतात.







अनुक्रमणिका

हा प्रकार एका रात्री घडला. ती रात्र बहुधा रमदान महिन्याच्या सव्वीसाव्या आणि सत्तावीसाव्या दिवसाच्या दरम्यानची असावी. या रात्रीलाच पुढे नियतीची निशा अशी संज्ञा प्राप्त झाली. कुराणात पुढे एक ठिकाणी या रात्रीसंबंधी असा उल्लेख आला आहे की, ती एक रात्र हजार दिवसांच्या हजार महिन्यांच्या मोलाची होती. प्रतिवर्षी मुसलमान या रात्रीकडे डोळे लावून बसतात कारण त्यांची अशी श्रद्धा असते की, त्या रात्री ठरलेल्या क्षणी स्वर्गाची दारे उघडतील आणि गूढ प्रकाश पसरेल आणि ज्या कोणाला तो प्रकाश दिसेल त्याच्या मनोकामना पूर्ण होतील ती तारीख इ. स. ६१० मधील किंवा त्यानंतरच्या काही वर्षातील होती.

तरीही महंमद साशंकच होता. ज्याचे दर्शन घडले होते तो होता तरी कोण? तो नुसताच त्याच्या कल्पनेचा खेळ होता की, एखादी पापी शक्ती त्याचा पिच्छा पुरवित होती? बहुधा भविष्यवेत्त्यासंबंधी त्याला जो तिरस्कार वाटत असे त्यामुळे तो अगदी अस्सल काहीन ( भगत ) प्रमाणे वागत असे. त्याने खादीजाला विश्वासात घेतले. तिचा एक म्हातारा चुलत भाऊ होता. तोही हनीफ जमातीतील भगत होता. त्याचे नाव वराक इब्न नौफल असे होते. तो विद्वान असून यहुदी आणि ख्रिस्ती अशा दोन्ही धर्म ग्रंथाचा त्याचा चांगला अभ्यास होता त्याला हिब्रू भाषा येत असे असेही सांगितले जाते. खादिजाने महंमदाला त्याच्याकडे पाठविले. महंमदाने कथन केलेल्या वृत्तांतानुसार " तिने त्याला सांगितले, '

"तुझा पुतण्या काय सांगतो ते ऐक" त्याने मला प्रश्न विचारले, आणि मी माझी हकीकत त्याला सांगितली. तो म्हणाला, 'हा तर मोझेसला ज्याचा साक्षात्कार झाला तो नामुस आहे! मी यावेळी तरूण असायला हवा होतो ! तुझ्या जमातीचे लोक तुला हाकलून देतील त्यावेळपर्यंत मी जिवंत मात्र रहायला हवा! ' मी त्याला म्हणालो, 'ते मला घालवून देतील कां?' तो उत्तरला 'हो. तू जे प्राप्त केले आहेस ते ज्याला ज्याला प्राप्त होते त्याला शत्रू निर्माण झाल्यावाचून रहात नाहीत. माझ्या हयातीत तुझी पाळी आली असती तर माझ्या सर्व शक्तीनिशी मी तुला सहाय्य केले असते. '

हा नामुस मुसलमानांना अगदी नवीन होता. सर्वश्रेष्ठ देवदूत जो गॅब्रियल तो म्हणजेच नामस असे ते मानीत. वस्तुत: नामुस हा शब्द नोमोस या मूळच्या ग्रीक शब्दापासून आलेला असून त्याचा अर्थ कायदा असा होता. मोझेसला ईश्वराचा साक्षात्कार झाल्यानंतर त्याने जुन्या कराराची जी पहिली पाच पुस्तके-पेंटाटयूच लिहिली असे मानले जाते त्याला हिब्रू भाषेत तोराह अशी

संज्ञा आहे. तोच अर्थ येथे अभिप्रेत आहे. आरमेनिक लोकभाषांतही हा शब्द गेलेला आहे. वराकचे म्हणणे असे होते की, ईश्वर वेळोवेळी आपली इच्छा मानवजातीला समजावी म्हणून जे साक्षात्कार घडवतो त्यापैकीच हा एक आहे.

खादीजानेही त्याला पुष्टी दिली. सुरवातीला त्या दोघांनी हे कोणाला कळू दिले नव्हते. त्याबाबत गुप्तता राखली होती. जसजसे महिने उलटत गेले तसतसे साक्षात्कार होणेही चालूच राहिले. त्याबाबत आता पहिल्या इतके आश्चर्य किंवा भीती वाटेनाशी झाली. परंतु अद्यापही साक्षात्काराच्या वेळचा अनुभव यातनामय असाच असे. असे सांगितले जाते की, ज्यावेळी महंमदाला असा झटका येत असे त्यावेळी त्याला जबरदस्त हुडहुडी भरून यायची आणि त्याचा चेहरा घामाने डवडवून जात असे, आणि एकादी नशा आल्यासारखा तो तासभर बेशुद्ध होवून पडत असे. त्याला उद्देशून जे शब्द उच्चारले जात ते त्याला ऐकू येत नसत. ऐन थंडीतही त्याला घामाच्या धारा लागत. साखळ्या, घंटा किंवा पक्ष्यांच्या पंखांची सळसळ यासारखे विचित्र आवाज त्याला ऐकू येत. माझा आत्मा माझ्या जवळून ओरबाडून घेतला जात आहे अशी भावना प्रत्येक साक्षात्काराच्यावेळी त्याला होत असे. सुरवातीला, आपल्या अंतर्यामी कसली तरी ऊर्मी येत आहे परंतु ती शब्दाने व्यक्त करता येत नाही अशी बहुतेकवेळी त्याची अवस्था होऊन जात असे. आणि नंतर एकदा ती अवस्था संपून गेली म्हणजे अंतर्यामी आलेल्या ऊर्मीशी मिळतेजुळते असे शब्द त्याच्या तोंडून उमटू लागत. निराळ्या शब्दात सांगावयाचे तर कॅथॉलिक गूढवादी ज्याला 'बौद्धिक साक्षात्कार' असे संबोधीत तशी ती अवस्था असे. त्याबरोबरच 'बौद्धिक दर्शन' ही निर्विवादपणे घडत असे. 'तुम्हाला जर काही दिसत नाही तर तो आपला ईश्वर आहे हे तुम्हाला कसे समजते ?' टेरेसा ऑफ अॅव्हिलाकडे पापनिवेदन करण्यासाठी आलेल्याने तिला विचारले. त्यावर स्वतःच्या अनुभवाच्या संदर्भात तिने असे उत्तर दिले की, ते मला माहीत नाही. मला चेहरा दिसला नाही परंतु माझ्याशी बोलला तो आपला ईश्वरच होता. तो भास नव्हता हे जे मी म्हटले आहे त्याहून अधिक काही मी सांगू शकणार नाही. तो जे शब्द बोलला त्यासंबंधी सांगावयाचे तर मला वाटेल त्यावेळी ते ऐकू येतच असे नव्हे. मात्र त्यासंबंधीचा विचार ध्यानी मनीही नसताना परंतु त्यांची गरज असे त्याचवेळी ते ऐकू येत. असे तिने लिहून ठेवले आहे. दुसऱ्या एका ठिकाणी यासंबंधी तिने असा खुलासा केला आहे की, अंतर्यामी किंवा बाह्यत: देखील आपल्याला प्रत्यक्ष असे काहीच दिसत नाही. परंतु काही

दिसत नसताना देखील आत्म्याला मात्र ते काय आहे ते जाणवते. आणि प्रत्यक्ष दर्शन घडण्यापेक्षादेखील तो कोठे आहे त्याची आत्म्याला होणारी ती जाणीव अधिक सुस्पष्ट असते. त्याचप्रमाणे त्याला काय सांगावयाचे आहे त्याचीही आत्म्याला स्पष्ट जाणीव होते ...... ही जाणीव कशी आणि कशाच्या योगाने होते ते सांगता येत नाही. पण तशी ती होते एवढे खरे. आणि ज्यावेळी हा प्रकार घडून येतो त्यावेळी ते जाणवल्यावाचून रहात नाही.

इतरवेळी तेच गूढवादी ज्याला दृष्टांत ( visions ) किंवा काल्पनिक उच्चारण असे म्हणतात. तसे महंमदाच्या बाबतीत घडून येत असे आणि पुढे पुढे ते वारंवार घडून येऊ लागले असे दिसते. देवदूत त्याच्याशी बोलताना त्याला दिसत असे आणि त्याचे बोलणे त्याला समजतही असे ( देवदूताची ) ही प्रतीमा आणि त्याच्या शब्दाची जाणीव त्याला अंतर्यामातून होत असे त्याचप्रमाणे त्याच्या ध्यानीमनीही नसताना एकदम झटका आल्याप्रमाणे हा प्रकार घडून येत असे. कधीकधी तर तो इतरांशी बोलत असताना किंवा उंटावरूनप्रवास करतानाही असे होत असे तर कित्येकदा प्रत्यक्ष अस्तित्वात असलेल्या व्यक्तीने बोलावे त्याप्रमाणे ही प्रतीमा किंवा तिने उच्चारलेले शब्द बाह्यरुप धारण करीत असत. मात्र त्याच्याबरोबर असलेल्या इतर व्यक्तींना ते दिसत नसे.

हळूहळू हे दृष्टांत आणि संदेश मिळण्याची विशिष्ट पद्धत महंमदाच्या अंगवळणी पडू लागली. काही काही वेळी तर ते यावेत म्हणून तो प्रयत्नही करीत असे. सुरवातीला असे संदेश त्याला मिळू लागले तेव्हापासून ते येवू लागले की, तो स्वतःभोवती कपडा लपेटून घेत असे सुरवातीला त्याला जे ऐकू येत असे ते तो लगेच व्यक्त करण्याचा प्रयत्न करीत असे तसे करताना तो घाईघाईने पुटपुटू लागे. कुराणातील काही सुरांच्या सुरवातीला जी असंबद्ध व्यंजने आलेली दिसतात आणि ज्यासंबंधी अनेक सिद्धांत मांडण्यात आलेले आहेत. त्याचा त्याच्या या घाईघाईने केलेल्या प्रकटीकरणाशी काही तरी संबंध असावा. त्याबाबत ईश्वराकडून त्याला ताकीदही मिळालेली होती.

तू ज्यावेळी ( मी उच्चारलेले ) शब्द म्हणतोस त्यावेळी ते घाईघाईने म्हणण्यासाठी तुझ्या जिभेची चळवळ करू नकोस.
( ते शब्द ) जुळवून म्हणवून घेण्याचे काम आमचे आहे.
आम्ही ज्या- वेळी ते म्हणतो त्यावेळी तू ते ऐकून घे.
नंतर त्याचा खुलासा करण्याचे काम आमचे आहे. (कुराण LXXV१६-१८)
पुढे ईश्वराचे त्याला पुन्हा हेच सांगणे होते.

जोपर्यंत माझ्या संदेशातील मतितार्थ तुला स्पष्ट होत नाही तोपर्यंत ते उच्चारण्याची धांदल करू नकोस.

( कुराण XX ११३ )

वरील उतारे हे काहीसे गूढ व संदिग्ध असले तरी त्यातून इतके निश्चित ध्वनित होते की, प्रेषिताला मिळणारी प्रेरणा सुस्पष्ट होवून त्याच्या मनातील गोंधळ नाहीसा होईपर्यंत त्याने ईश्वरी संदेशाला बाह्य अभिव्यक्ती देण्याच्या भरीस पडू नये.

यातून महंमदाच्या जीवनासंबंधीची चर्चा करताना अपरिहार्यपणे एक प्रश्न उपस्थित होतो. त्या प्रश्नाचे त्रोटक उत्तर मी दिलेले आहे. पण या ठिकाणी त्याचा तपशीलवार उहापोह करावयाचा आहे. तो प्रश्न म्हणजे त्याच्या प्रामाणिकपणासंबंधीचा.

कोणत्याही धर्माच्या संदेशासंबंधीच्या अविश्वनीय स्वरूपावरून तो संदेश देणाराला खोटारडा ठरविण्याचा जमाना आपण केव्हाच मागे टाकलेला आहे उदाहरणार्थ अठराव्या शतकातील ख्रिस्ती धर्माचे समर्थक आणि धर्म-शास्त्रवेत्ते यांच्यासारखे बुध्दीवादी तत्ववेत्ते हे महंमदाकडे निवळ एक ढोंगबाजी म्हणून बघत असत. त्याच्या आयुष्यातील काही संशयास्पद घटनांवरून आपल्या समकालिनांवर छाप पाडण्यासाठी तो चमत्कार करून दाखवीत असे असेही त्याच्यावद्दल म्हटले जात असे. यात फरक इतकाच होता की, तत्व-वेत्ते सर्वच धर्मसंस्थापकांसंबंधी असे विधान करीत, तर व्हॉल्टेअरसारखे काही लोक मात्र इतिहासाच्या रंगभूमीवर आपल्या लोकांना जरा चांगले स्थान मिळवून देण्याची महंमदाची जी स्वाभाविक महत्वाकांक्षा होती तिला पोषक असे वातावरण त्याला लाभले होते असे दाखवून देण्याचा प्रयत्न करीत. महं-मदाचा जन्म ज्या काळात झाला होता आणि त्याला ज्यांचे नेतृत्व करावयाचे होते त्या अरबांचा आडदांड स्वभाव लक्षात घेता अशा जनतेवर छाप पाड-ण्यासाठी त्याला धूर्तपणाचा अवलंब करणे अपरिहार्यच होते. एकोणिसाव्या शत-काच्या उत्तरार्धातील हयूबर्ट ग्रिम नावाच्या अरबी भाषेच्या एका जर्मन पंडि-ताने अशाच तऱ्हेचा युक्तिवाद करून महंमदाच्या डोळ्यासमोर याहूनही जास्त प्रशंसनीय उद्दिष्टे होती असे म्हणून त्याचे समर्थन केले आहे, ग्रिमच्या मते महंमदाला असे वाटत होते की, मक्का या आपल्या जन्मगावातील सामाजिक परिस्थितीवर काहीतरी उपाय शोधून काढला पाहिजे, आणि तसे करण्याचा एकमेव मार्ग म्हणजे आधुनिक शब्दात सांगावयाचे तर श्रीमंतांचे शोषण करणे, उत्पन्नावर जबरदस्त कर बसवून त्यायोगे गरिबांना सहाय्य



अनुक्रमणिका



करण्याची कल्पना त्याने काढली. कारण उत्पन्नावरील कराचा बोजा हा मुख्यतः अर्थात श्रीमंत असलेल्यांवरच पडणार होता. परंतु श्रीमंत लोकांकडून याला संमती मिळण्याची शक्यता नाही हे त्याला कळून चुकले. तथापि एकोणिसाव्या आणि विसाव्या शतकात रूढ झालेली भीषण वर्ग युद्धाची कल्पना महंमदाच्या मनात मुळीच नव्हती, त्यामुळे ग्रिम ज्याला समाजवादी कार्यक्रम म्हणून संबोधतो तो कार्यक्रम भीतीच्या पोटी श्रीमंतांना स्वीकारावयास लावता येईल असो महंमदाला आशा वाटत होती. ग्रिमने आपला हा ग्रंथ लिहिला त्यावेळी जर्मनीतील सोशल डेमोक्रॅटिक पार्टीची नेत्रदीपक घोडदौड सुरु होती व त्यामुळेच बहुधा त्याने महंमदाच्या कार्यक्रमाचा उल्लेखही समाजवादी म्हणून केला असावा. हे घडवून आणण्यासाठी त्याने पुराण कथा निर्माण केल्या. त्यासाठी जुन्या कथांचा कमीत कमी उपयोग करून घेतला. स्वर्गातील न्यायाधीशाला शुद्धीकरणाचा कर (जकात) देऊन संतुष्ट केले नाही तर श्रीमंताची अवस्था फार शोचनीय होईल असे जे 'अखेरच्या निर्णयात' म्हटले आहे तेच महंमदानेही सांगून ठेवले.

मानसशास्त्र आणि मानसोपचार यात जी प्रगती झाली आहे त्यामुळे अशा धूर्तपणाचा इतक्या सहजासहजी अन्वयार्थ लावणे शक्य राहिलेले नाही मग तो धूर्तपणा समर्थनीय असो वा असमर्थनीय असो. उलट त्यासंबंधीची प्रतिक्रिया आता अगदी दुसऱ्या टोकाला गेली असण्याचीही शक्यता आहे. कारण धूर्तपणाची खरीखुरी उदाहरणे घडलेली आहेत आणि आजही घडत आहेत. अर्थात त्यांची संख्या मर्यादित आहे. आपल्याला वरूनकडून दृश्य श्राव्य आणि मानसिक संदेश मिळतात अशी अगदी प्रामाणिक समजूत असणाऱ्या काही व्यक्ती असतात हे आता सर्वसाधारणपणे सर्वांना कळून चुकले असून अशा व्यक्ती असू शकतात हेही आता मान्य झाले आहे. परंतु तेवढ्यावरून असे संदेश आपल्याला वरून मिळतात हा त्यांचा दावा कितीही प्रामाणिकपणाचा असला तरी त्यांचा तो प्रामाणिकपणा हे काही त्यामागील सत्यतेचे प्रमाण ठरू शकत नाही; अबोधासंबंधीच्या संकल्पनेमुळे या गोष्टींचा उलगडा होणे आता शक्य झाले आहे. ही गोष्ट आता अनेकांना माहीत झालेली आहे. इतकेच नव्हे ती सर्वमान्यही झालेली असल्यामुळे त्यासंबंधी विस्ताराने उहापोह करणे इतकेच नव्हे तर मानसशास्त्रज्ञ त्यातून जे अर्थ काढतात त्यासंबंधी देखील विस्ताराने काही सांगत बसण्याची आवश्यकता राहिलेली नाही. मानसशास्त्रावरचे कोणतेही एकादे पाठ्यपुस्तक काढून पाहिले तरी आपण पूर्वी कधीही न पाहिलेल्या किंवा ऐकलेल्या गोष्टी

आपल्याला खरोखरीच दिसल्या किंवा आपण ऐकल्या असे सांगणाऱ्यांची अवस्तुभ्रमाची शेकडो अस्सल उदाहरणे त्यात दिलेली आढळतील. परंतु अशा प्रकरणांचा वस्तुनिष्ठ अभ्यास केला तर असे आढळून येते की, त्यांनी पूर्वी जे पाहिलेले आणि ऐकलेले असते परंतु ज्याची त्यांना स्मृती राहिलेली नसते, त्याच त्यांच्या अबोधाशी असलेल्या साहचर्यामुळे नव्याने अभिव्यक्त होते ही वस्तुस्थिती आपण आता गृहीत धरून चालतो. त्यावरून असे म्हणता येईल की, यहुद्यांशी किंवा ख्रिस्त्यांशी बोलताना त्यांनी महंमदाला ज्या गोष्टी वर्णन करून सांगितल्या होत्या त्याच आपल्याला अतिभौतिक म्हणून दिसल्या किंवा ऐकू आल्या असे त्याला वाटले असणार. त्याच्या तोंडातून जे शब्द बाहेर पडले, त्याला ज्याचा प्रत्यक्ष अनुभव आलेला होता, त्याच्या मनात जे विचार घोळत होते, तो जी स्वप्ने रंगवित होता आणि ज्यासंबंधी त्याचे चिंतन चाललेले असे त्याच गोष्टीचा काटछाट होवून आणि निराळे स्वरूप धारण करून पुन्हा प्रकट झाल्या असतील आणि त्याच त्याला अगदी वास्तव वाटल्या असतील. कोणती तरी बाह्य शक्ती त्याच्यामागे असल्याचे हे प्रमाण आहे असे त्याला वाटले असेल हे सहज समजण्यासारखे आहे. इतर कोणाच्या मनाला या अबोधाचा थांगपत्ता लागणे शक्य नसले तरी ती प्रत्यक्ष वस्तुस्थिती होती.

महंमदाचे अगदी सुरवातीचे संदेश नीट अभ्यासले आणि त्याबरोबरच अशा संदेशाच्या आगेमागे त्याला नैराश्याचे आणि साशंकतेचे जे झटके येत असत ते विचारात घेतले म्हणजे त्यामागे महत्वाकांक्षा आणि परोपकाराचा हेतू एवढेच मनात ठेवून कडवेपणाने तो आपल्या योजना पार पाडीत असे अशी जी उपपत्ती लावली जाते त्याविषयी शंका निर्माण होते. महंमदाच्या मनातील नैराश्य किंवा सांशंकता यासंबंधीच्या हकीगती सप्रमाण आहेत. महंमदाचे व्यक्तिमत्व अतिभौतिकाशी निगडित होते यावर भर देणाऱ्या ज्या आख्यायिका आहेत त्या मनुष्य मात्रात आढळणाऱ्या वैशिष्ट्यांना मुळात काही आधार असल्याशिवाय रचल्या गेल्याच नसत्या. म्हणून धूर्त अशा महंमदाच्या प्रतिमेपेक्षा खऱ्याखुऱ्या महंमदालाच यथार्थपणे समजून घेणे सोपे जाते.

पुढे पुढे महंमदामध्ये अस्वस्थ करून सोडणारे काही गुण विशेष उद्भवले हे खरे. महंमदाला रोजच्या रोज काही निर्णय घ्यावे लागत, आणि ते निर्णय राजकीय, कायदेविषयक त्याचप्रमाणे व्यावहारिक स्वरूपाचे असल्यामुळे कोणती तरी बाह्य शक्ती ते निर्णय आपल्या तोंडाने वदवील म्हणून वाट पहात बसणे त्याला शक्य नसे. ते तडकाफडकी घेणे आवश्यक असे. त्याच्यावर प्रश्नांचा सतत भडीमार होत असे त्याचप्रमाणे सारखे कोणी ना कोणी त्याला

सल्ला विचारायला येत असे. तो जी उत्तरे देत असे ती दैवी प्रेरणेने याबीत तशा स्वरूपाची असत त्यामुळे त्यांना अधिकाराचे खंबीर अधिष्ठान प्राप्त होत असे. सत्याचा किंचित अपलाप करण्याच्या मोहास तो बळी पडत असे का? त्याला झालेले काही साक्षात्कार हे त्याच्या स्वतःच्या मनातील मानवी इच्छा किंवा त्याने बांधलेले आडाखे यांच्याशी अतिशय मिळते जुळते आहेत. का या ठिकाणीही त्याचे अबोध मन व्यक्त होत होते? ते आपल्याला कधीच सांगता येणार नाही. परंतु तरीही या प्रश्नाचा उहापोह सहाव्यां प्रकरणात पुन्हा एकदा केलेला आढळेल.

महंमद हा प्रामाणिक होता असे मानले आणि जरा परखडपणे बोलावयाचे झाले तर आपण ज्याला दृश्य आणि श्राव्य अवस्तुभ्रम असे म्हणतो ते त्याला सारखेच होत असले तर तो काही बाबतीत अपसामान्य किंवा विकृत, किंवा वेडगळ होता असे म्हणावयाचे का ? पहिली गोष्ट म्हणजे वेडगळपणाविषयी बोलावयाचे तर ती संपूर्ण सकल्पना तज्ञांनी त्याज्य ठरविली आहे. सामान्य आणि अपसामान्य वर्तणूक यामधील आताची सीमारेषा पूर्वी समजली जात असे त्यापेक्षा खूपच लवचिक असते. काही 'अपसामान्य' स्वभाव वैशिष्टचे ही बहुतेक सर्वच माणसांत आढळतात. ज्यांच्या ठिकाणी अशी वैशिष्टचे विशेष तीव्रतेन आणि सातत्याने आढळतात अशांनाच फक्त मज्जाविकृत किंवा वेडे म्हणतात.

योग्य परिस्थिती लाभल्यामुळे सुरवातीपासूनच महंमदाचा स्वभावधर्म नेमका गूढवाद्याला साजेसा बनलेला होता. त्याचे लहानपण त्याची पौगंडावस्था इतकेच नव्हे तर वयात आल्यानंतरही त्याची परिस्थिती देखील अशा स्वभावधर्माला पोषक अशीच बनली होती. त्याने संन्यासवृत्तीचा अंगिकार करण्यास स्वतःला वाहून घेतले होते. सर्वच गूढवाद्यांचा त्यांच्या ध्येयमार्गावरील हा एक टप्पा असतो. आणि त्या मार्गाकडे स्वेच्छेने असो वा अनिच्छेने असो ते खेचले जात असतात. आपातत: किंवा कर्मेंद्रियापासून उद्भवलेल्या मीपणातून स्वतःला मुक्त करुन घेणे, आणि त्याबरोबर येणारे मोह आकर्षण आणि इच्छा शक्य तेवढया दूर सारणे, बाह्यजगाबरोबरचे संबंध शक्यतितके तोडून टाकणे आणि ते ज्या सत् तत्वाचा ( Being ) शोध घेत असतात त्याला अत्यंत नम्र भावाने शरण जाणे हा त्यांचा मार्ग असतो. अशा तऱ्हेने त्याचा आत्मा ज्यावेळी शून्यात अवगाहन करीत असे त्यावेळी ती पोकळी भरून टाकणारी भावनोत्कटतेने केलेली प्रार्थना त्याला तो त्याचा शोध घेत होता त्याच्या अधिक समीप घेऊन जात असे. या मार्गाने गेलेल्या इतर अनेकां प्रमाणेच महंमदालाही मग

मधूनमधून उन्मनी किंवा तन्मयावस्था प्राप्त होत असे आणि अशावेळी त्याला आपले स्वतःचे व्यक्तिमत्व हिरावून घेतले जात आहे असे वाटून त्या गूढ शक्तीकडून होणाऱ्या आक्रमणाला कसलाही प्रतिकार न करता तो शरण जात असे. त्या गूढ शक्तीच्या स्वरूपाबद्दल त्याला अनिर्वचनीय, अनिवेदनीय अशी जाणीव होत असे आणि असे होत असताना त्याला अवर्णनीय असा आनंद होत असे. या अवस्थेत, इतर अनेकांप्रमाणेच, आंतरिक किंवा बाह्य-स्वरूपात आणि मानसिक किंवा काल्पनिक स्वरुपात काही गोष्टी दिसतात. किंवा ऐकू येतात यावर वर्णिलेल्या अपूर्व घटनेचा त्याला अनुभव येत असे.

उन्माद मनोविभाजन आणि अनावर बडबड या सारख्या मानसिक विकृती झालेल्या व्यक्तींच्या बाबतीतही अशा प्रकारच्या उन्मनावस्था आणि इंद्रियगोचर घटना अगदी त्याच स्वरुपात आपल्याला आढळून येतात. मोठमोठे गूढवादी मग ते पुरुष असोत वा स्त्रिया असोत, ज्यांच्या ठिकाणी साहजिकच अशा तऱ्हेच्या विकृति संभवतात आणि जे कोणत्याही पूर्वतयारी शिवाय संन्यासमार्गीच्या अवलंबनाने याचा पुन्हा अनुभव घेतात. त्यांच्यासंबंधी कोण-तेही निष्कर्ष काढणे हे मानसशास्त्रज्ञ आणि मानसोपचार तज्ज्ञ यांच्यावरच सोपवलेले बरे. याबाबतीत त्यांना येणारा अनुभव हा अधिक विशुद्ध आणि उदात्त असतो की मनोरूग्णासारखी संन्यासमार्गीच्या आचरणाने कृत्रिमरित्या तशी अवस्था निर्माण केली जाते. तेही मानसोपचारतज्ञ आणि मानसशास्त्रज्ञ यांनी ठरवावयाचे आहे.

ख्रिश्चन आणि मुस्लीम या दोन्ही धर्मातील गूढवादी येवढ्यावरच थांब-लेले नाहीत. सर्वसाधारणपणे उन्मनावस्था आणि इंद्रियगोचर घटना घडेनाशा होतात आणि दीर्घकाळपर्यंत ईश्वर त्यांच्याकडे पाठ फिरवतो. असा त्यापुढचा रूक्ष अनुभव त्यांना दीर्घकाळपर्यंत येत राहतो. वरवर पाहता ईश्वराने आपला त्याग केला आहे या आभासामुळे त्यांना जो धसका बसतो त्यामुळे स्वतःला आलेल्या अनुभवांबद्दलच त्यांचे मन साशंक होते, तर त्याचबरोबर त्यामुळे अनिर्वचनीय अशा ज्या आनंदाला 'आपण पारखे झालो आहोत तो आनंद पुन्हा प्राप्त व्हावा अशी उत्कट इच्छा त्यांच्या मनात निर्माण होते. ही अत्यंत क्लेशकारक अवस्था कित्येक वर्षे राहू शकते. त्या नंतर पुन्हा उन्मनावस्था प्राप्त होते परंतु आता ती स्थिर आणि अधिक निश्चित स्वरूपाची असते. एच्. डिलाक्रॉचा आधार घेऊन यालाच ईश्वरमय अवस्था असे म्हणता येईल. ज्या सत् तत्वाचा शोध घेण्यासाठी इतके परिश्रम घेतलेले असतात. त्याच्याशी निरंतरचे सख्य साधले गेले म्हणजे ख्रिस्ती किंवा मुस्लीम गूढवाद्यांना

शांती आणि सौख्य लाभते. खिस्ती गूढवाद्यांच्या दृष्टीने ईश्वराबरोबरचे हे मीलन म्हणजे विशिष्ट प्रकारची अनुरक्तीच असते. हिंदू गूढवाद्यांच्या मते हा एक अनिर्वचनीय व्यक्तिनिरपेक्ष केवल अनुभव असतो. सर्व वास्तवतेचा तोच मूलाधार असतो. आणि आत्मज्ञान प्राप्त करून घेतल्याने तो मिळू शकतो. कारण माझ्या स्वतःच्या अस्तित्वाचे जे गूढ असते त्यापेक्षा तो अनुभव निराळा असे काही नसते.' ( एल् गारडेट ) कॅथॉलिक पंथीय गूढवादी हे जसे त्याच्या स्वतःच्या कट्टर धर्मशास्त्राला जखडलेले असत. तसे मुस्लीम गूढवाद्यांचे नसे. त्यांच्यात भिन्न मतप्रणाली असल्याने कॅथॉलिक गूढवाद्यांपेक्षा ते आपले विचार अधिक मोकळेपणाने व्यक्त करू शकत असत त्यामुळे त्यांच्या दृष्टीने बाह्यतः स्वत्व आणि ईश्वर या दोन्हीचे अस्तित्व अगदी स्वतंत्र असले तरी त्यांच्यात संपूर्ण अद्वैतच असते. ज्याला स्वतःच्या मतांबद्दल पुढे फार छळ सोसावा लागला तो दहाव्या शतकातील कवी हुसेन इब्न मन्सूर अल् हलाज याच्या शब्दात सांगावयाचे झाले तर

मी ज्याच्यावर प्रेम करतो तो मीच झालो आहे.<br>
आणि तो मी झाला आहे.<br>
आमचे आत्मे दोन आहेत पण त्यांचा एका कुडीत<br>
संयोग झाला आहे.......<br>
तुम्ही ज्यावेळी मला पाहिले त्यावेळी त्यालाही पाहिले असते.<br>
आणि ज्यावेळी तुम्ही त्याला पाहिले तेव्हा तुम्ही<br>
आम्हाला पाहिलेले असते......,.<br>
आणि म्हणून मला पाहणे म्हणजे त्याला पाहणे<br>
आणि त्याला पाहणे म्हणजे तुम्हाला पाहणे होय.

इतर गूढवाद्यांना परिचित असलेल्या निष्फळ किंवा शुष्क कालखंडातून बहुधा महंमदालाही जावे लागले असावे. परंतु तो ईश्वरत्वाच्या ( थिओ-पॅथिक ) अवस्थेप्रत मात्र कधी पोहोचू शकत नाही. ईश्वर त्यांच्याशी बोलत असे, त्याला संदेश पाठवीत असे, त्याची खरडपट्टी काढीत असे त्याचे सांत्वन करीत असे आणि त्याच्यावर हुकमतही गाजवीत असे. पण तरीही महंमदाला आपण त्याच्यापासून निराळे आहोत आणि त्याच्यापासून फार अलग पडलो आहोत असे वाटत असे. ते दोघे अगदी वेगवेगळ्या जगात वावरत असत आणि दोघांच्या जगात इतकी दरी पसरलेली असे की, ती जुळविण्यासाठी मध्यस्तांची जरूर असे.

त्यामुळे गूढवाद्यांच्या प्रवासाच्या पहिल्या टप्प्यावरच महंमदाची गती खुंटली

कॅथॉलिक धर्मशास्त्रात ज्याला अनुग्रह किंवा कृपादृष्टी असे म्हणतात. ती दृश्य आणि श्राव्य स्वरूपात त्याला लाभली होती. सर्वसामान्य मर्त्य माणसावर त्याची छाप पडली तरी महान गूढवाद्यांच्या दृष्टीने तात्कालिन आणि क्षण-भंगुर अशा लक्षणापलीकडे त्याला महत्व नव्हते. इतकेच नव्हे तर त्यांना ही लक्षणे संशयास्पद आणि धोकादायकही वाटत. सैतानाचा तर तो खेळ नसेल ना किंवा त्याच्या कल्पनाशक्तीतून तर स्वाभाविकपणे त्यांची निर्मिती झालेली नसेल ना अशी देखील शंका त्यांच्या मनाला चाटून जाई. आत्मप्रीती, अभि-मान आणि अभिलाषा यांना उत्तेजन मिळणे संभवनीय आहे. फार तर असे म्हणता येईल की, केवळ तात्पुरत्या अवस्था असून त्यांमधून प्रत्येक गूढवाद्याला जावेच लागते. पाखंडी मताचे महान मुस्लीम गूढवादी हा ईश्वराचे संदेश प्रक्षेपित करणारा पैगंबर केवळ एक यंत्रमानव आहे किंवा तो प्राथमिक अवस्थेतील ध्वनिमुद्रित यंत्र ( म्हणजेच ग्रामोफोन ) किंवा एकादे ध्वनिवर्धक आहे असे समजत असत.

गूढवादी आणि मानसिक विकृती झालेले लोक यांना येणाऱ्या अनुभवात स्पष्ट असा भेद करता येत नाही हे आधुनिक मानसोपचार तज्ञांना मान्य करणे भाग पडते. त्यामुळे हे अवस्तुभ्रम आणि उन्मनीवस्था त्यांच्या धार्मिक श्रद्धांच्या बाबतीतही पेच निर्माण करतात. सरतेशेवटी यातील खराखुरा भेद आणि त्यासंबंधीचे विश्लेषण हे ज्या व्यक्तींना तो अनुभव येतो त्यांच्या व्यक्तिमत्वावर अवलंबून असतो. एका बाजूला ज्यांचे मनोव्यापार क्षुद्र आणि चुकीचे चाललेले असतात अशा दुर्बळ आणि विस्कटित व्यक्तिमत्वाच्या व्यक्ती असतात तर दुसऱ्या बाजूला थोर मनाच्या, प्रबळ आणि चांगले एकात्म व्यक्तिमत्व असलेल्या व्यक्ती असतात. अशा व्यक्तीपाशी व्यापक आणि दूरगामी कल्पना असतात. अनेकदा सखोल आणि विधायक मनोव्यापार करण्याची क्षमताही यांच्यापाशी असते. आणि त्यांना झालेल्या गूढ अनुभवांचा उपयोग ते आपल्या नूतन व खास वैयक्तिक तत्वज्ञानाचा आधार म्हणून करून घेतात. गूढवादी दृष्टीकोनातून पाहता महमदांत काहीही जरी उणीवा असल्या तरी तो दुसऱ्या वर्गात मोडतो. म्हणजे इतर थोर गूढवाद्यांप्रमाणे स्वयंशिस्त लावून घेण्यासाठी आणि स्वतःला जिंकून घेण्यासाठी त्याने अतिशय परिश्रम घेतले होते.

अशा तऱ्हेच्या सर्वस्वी व्यक्तिगत अनुभवांशी या तत्वज्ञानाची सांगड घालावयाची असेल तर ती समाजाच्या विशिष्ट चौकटीतच घालता येते. महंमदाने ख्रिश्चन साधुपासून चालत आलेला योग्यांच्या शिस्तीचा किंवा

अनुसरला होता. हनीफांकडून बहुधा आधीपासूनच त्याच शिस्तीचा अंगिकार करण्यात आला असावा. अशा तऱ्हेच्या वर्तनातून इंद्रियगोचर असे जे असाधारण प्रकटीकरण उद्‌भवत असे ते त्याला अगदी अनपेक्षित असे त्यामुळे कवी किंवा काही न झपाटले गेले म्हणजे कसे वागत त्याचे उदाहरण त्याच्या डोळ्यापुढे असल्याने तो त्यांचेच अनुकरण करत असे. तो ज्यावेळी स्वत:ला कपड्यात लपेटून घेण्यासाठी घाईघाईनें खादिजाकडे जात असे त्यावेळी तो आपोआपच काहिनांच्या वर्तणुकीचेच अनुकरण करीत असे. त्याच्या दृष्टीने असे पाहिले तर काहिनांचा हा आदर्श त्याला नकोसा वाटणारा असला तरी त्याच्यापुढे तेवढा एकच पर्याय होता.

वस्तुत: त्याला अगदी सुरवातीला झालेल्या साक्षात्काराच्या वेळी आपल्या ईश्वराकडून जे शब्द ऐकू आले म्हणून तो सांगतो आणि जे तो पुन्हा पुन्हा उच्चारीत असे, नेमके तेच शब्द वाळवंटातील भविष्यवेत्त्यांनाही ऐकू येत असत. वाळवंटातील हे भविष्यवेत्ते देखील त्याच गूढवादी मार्गाचे प्रवासी होते परंतु त्यांच्या त्या प्रवासाची मजल अगदीच मर्यादित राहिली. काहिनांप्रमाणेच महंमदाच्या तोंडातून निघणारे शब्द देखील तुटक वाक्यप्रयोगाच्या स्वरूपात असत. ज्यावेळी त्याला जोराचे आवेग येत त्यावेळी बहुधा ते त्याच्या तोंडून निघत असावेत मात्र ते जवळ जवळ संपूर्णपणे यमकबद्ध असत. अरबी भाषेत याला साज म्हणजे यमकबद्ध गद्य असे म्हणतात. काहिनांच्या बाबतीत अशा उद्‌गारात वास्तव जगातील सर्व वस्तूंना उद्देशून घेतलेल्या शपथांचा भरणा असे महंमदाच्या बाबतीतही तसेच होते. आणि अगदी प्राथमिक स्वरूपातील काव्याचा भारून टाकणारा प्रभाव तेरा शतकांनतरही तितकाच परिणामकारक राहिलेला आहे हे विशेष.

महंमदाने त्या काळात कोठलेही औपचारिक नवप्रवर्तन केले नाही परंतु तो जे काही म्हणाला त्याचा आशय अगदी नवा होता याबाबत बिचाऱ्या काहिनांपेक्षा तो फार पुढे गेलेला होता. कारण हे काहीन त्यांच्यासारख्या माणसांनी जे करावे अशा परंपरागत अपेक्षा होत्या त्याप्रमाणेच काय ते वागत आणि महंमदाने उच्चारलेल्या शब्दांच्या आशयावरून असे प्रतीत होते की, त्याच्यातील अबोध ( मन ) अधिक समृद्ध होते.

तो लहानाचा मोठा कोणत्या परिस्थितीत झाला ते आपण यापूर्वीच पाहिले आहे. कुरेशाइट समाजातील मुलांना अनुकरणातून शिक्षण मिळत असे व त्यायोगे मुले सभोवतालच्या सांस्कृतिक वातावरणाशी समरस होवन जात असत. कुरेशाइटांच्या या पार्श्वभूमीवर महंमदाच्या मनात आलेले

विचार सखोल बनते गेले त्याचप्रमाणे त्यात बदल होत गेले आणि त्या काळात सबंध अरबस्तानात एकेश्वरी विचारप्रवाहाची जी लाट उसळली होती त्यामुळे त्या विचारांना बळकटी येत गेली. महंमदाला स्वतःला ज्या अडचणी सोसाव्या लागल्या होत्या त्यामुळे श्रीमंत आणि सत्ताधारी यांच्याबद्दल त्याची वृत्ती चिकित्सक बनली होती आणि त्यामुळेच सर्वसाधारणपणे परंपरागत धर्मानुयायांबद्दलही त्याची तशीच वृत्ती बनली होती. त्याचा परिणाम असा झाला की, नव्या कल्पनांबाबत विचार करताना तो आपले मन खुले ठेवू शकला. समाजाची शिकार बनणाऱ्यांशी एकरूप होऊन त्यांची दुःखे ती आपली समजून त्यात सहभागी होत असे. विद्यमान प्रस्थापिताच्या बाजूने उभे राहणाऱ्यांना वठणीवर आणण्यासाठी आणि ( समाजातील ) त्यांच्या प्रतिष्ठेचे समर्थन करणारी तत्वप्रणाली मोडून काढण्यासाठी तो त्यांना त्यांचे बरोबर स्थान दाखवून देत असे.

यावरून महंमदाची प्रवृत्ती क्रांतिकारी होती हे दिसून येईल. सर्व सत्‌त्वाचा साक्षात गाभा असलेला त्याचा ईश्वर त्याला दर्शन देत असे आणि त्याचे शब्द त्याला ऐकूही येत असत. ईश्वराशी महंमदामधील गूढवाद्याचा प्रत्यक्ष संबंध येत असे. त्याच्या स्वतःच्या वैयक्तिक अनुभवाला 'केवल' मूल्य असे त्याला त्याविषयी कसलीही शंका नव्हती. त्याचप्रमाणे पूर्वी आलेल्या तशाच स्वरूपाच्या काही साक्षात्कारांचाच हा विस्तार असला तरी सामाजिक जीवनाचे नियमन करणाऱ्या कोणत्याही नियमांशी त्यांचा संबंध नसे. आपल्या विचारांत कसलाही दोष नाही. असे मानणाऱ्या बुद्धिवाद्यांप्रमाणे तो स्वतःला सवयीचा गुलाम समजत नव्हता.

मग त्या पवयींना विवेकशीलतेचा केवढाही मुलामा असो.

लेसझेक कोलाकोवस्की याने ही (समाज) पद्धती विरुद्ध व्यक्तीच्या विवेकाने केलेलं बंड असे गूढवादाचे वर्णन केले आहे.

गूढवाद हा निश्चितच खाजगी अनुभवाचा प्रकार आहे. आणि ज्या व्यक्तीला तो अनुभव आलेला असतो त्याच्यादृष्टीने त्याला एक 'केवल' मूल्य असते. म्हणून ज्यावेळी समाजपद्धती म्हणजेच संस्था किंवा कल्पना यांची प्रस्थापित चौकट ही व्यक्तीला होणाऱ्या साक्षात्काराशी विरोधी असते त्यावेळी बरोबरोच त्याला अशा अनुभवाच्याच उठावाचे स्वरूप प्राप्त होऊ शकते. परिस्थिती समान असेल तर विशुद्ध विज्ञान किंवा तत्वज्ञान याच्या बाबतीतही असेच घडू शकते. अशा तऱ्हेच्या उत्स्फूर्त गूढवादी क्रियाशीलतेची

दखल घेण्याइतक्या लवचिक आणि सूज्ञ अशाही काही पद्धती असतात व त्या गूढवादी क्रियाशीलतेला स्वतःत सामावून घेतात. एवढेच नव्हे तर त्यातील चेतनानयनेचाही त्या पद्धती उपयोग करून घेतात. कॅथॉलिक पंथसुद्धा त्यांपैकी एक पद्धत होय. टेरेसा ऑफ ॲव्हिला आणि जॉन ऑफ दि क्रॉस यांना थोर कॅथॉलिक गूढवादी म्हणून स्थान प्राप्त झाले आणि ज्या धर्मपंथाला ते धक्का देऊ शकले असते त्याचे ते भूषण ठरले ते यामुळेच.

महंमदाला आपले दरवाजे उघडे करून देणारी यासारखी कोणतीही विचारपरंपरा अरबस्तानात अस्तित्वात नव्हती. त्याच्या देशातील रूढ समजुती आणि संस्था यावर हल्ला चढविण्यापासून त्याला परावृत्त करू शकेल अशी कोणतीही यंत्रणा नव्हती. त्याच्या स्वतःच्या सावधपणामुळे त्याला काय पायबंद बसला असेल तेवढाच. त्यामुळे तो प्रसंगानुरुप वागू लागला. अर्थात त्यामुळे अंतिमतः तो स्वतःच्या योजना तडीस नेण्याच्या मार्गापासून त्याला कोणी परावृत्त करू शकले नाही. सुरवातीला आपल्या साक्षात्कारासंबंधी तो कोणापाशी वाच्यता करीत नसे परंतु कुरेशाइट लोकांचे काही नुकसान झाले असेही नाही.

महंमदाने दिलेला पहिला संदेश कोणता ते बऱ्याच निश्चितपणाने सांगता येते. इस्लाम संबंधीची माहिती नसलेल्या वाचकांसाठी या संबंधात एक दोन गोष्टींचा खुलासा केला पाहिजे. महंमदाला झालेले साक्षात्कार म्हणजे अल्लाच्या प्रेरणेने त्याच्या तोंडून जे शब्द समुच्चय उच्चारले गेले त्याला पठण किंवा अरबी भाषेत कुराण असा शब्द आहे. त्याच्या हयातीत चामड्याचे तुकडे, उंटाची हाडे, खापराच्या किंवा चिनी मातीच्या भांड्याचे तुकडे, तालवृक्षाची पाने अशा नानाप्रकारच्या वस्तूंवर त्याचे संदेश लिहून घेतले जात. त्याच्या हयातीतच त्याने उच्चारलेले शब्दसमुच्चय एकत्र करण्यात येवू लागले व त्यांचे अध्याय किंवा सुरा पाडण्यात येवू लागे. त्यासर्वांना मिळून पठण ( recitation ) किंवा अरबी भाषेत अल् कुराण म्हणून संबोधण्यात येवू लागले. त्यावरूनच पुढे इंग्रजीत अलकुराण हा शब्द आला. कालांतराने त्यातील 'अल्' अरबी भाषेतील उपपद गळाले व त्याला 'कुराण' असे साधे नामाभिधान प्राप्त झाले. त्यानंतर काही काळाने अनेक ख्यातनाम मुसलमानांनी सर्व सुरांचा त्यांच्या दृष्टीने परिपूर्ण असा संग्रह केला. त्यापैकी सरतेशेवटी एकच संग्रह शिल्लक राहिला आहे. पहिला सुरा वगळता या संग्रहातील सुरा साधारणपणे कमी कमी लांबीच्या संग्रहित होत गेल्या आहेत. त्यामुळे कुराणाच्या अधिकृत आवृत्तीत किंवा त्याच्या बहुतेक भाषांतरात येणाऱ्या सुरांच्या कालानुक्रमाशी कसलाही संबंध राहिलेला नाही.

तथापी मुसलमान अभ्यासकांनी त्यापूर्वीच कुराणाचा विशिष्ट भाग कोणत्या कालखंडात ज्ञात झाला त्यासंबंधीची परंपरागत माहिती एकत्रित केली होती. युरोपातील पौर्वात्य भाषा कोविदांनी त्याच्यापरीने कुराणातील विविध भागांची शैली व अंतर्गत निकष यांच्या अध्ययनाने कुराणातील सुरांच्या कालानुक्रमासबंधी अधिक निर्दोष असे निकर्ष काढले आहेत आणि जरूर तेथे त्यात दुरूस्त्या करणेही त्यांना शक्य झाले आहे. त्यांना काल-खंडानुसार त्याचे ठोकळमानाने भागही पाडता आले आहेत. कालानुक्रमानुसार भाषांतरित केलेल्या कुराणाच्या आवृत्तीही प्रसिद्ध झाल्या असून रेजिस ब्लाचर यांची फ्रेंच आवृत्तीही त्यापैकी सर्वात अलिकडची समजली जाते. त्यांनी केलेले कुराणाचे संपादन इतके विद्वत्तापूर्ण आहे की, त्यापूर्वीच्या सर्व फ्रेंच भाषांतरापेक्षा ते कितीतरी सरस ठरते. रिचर्ड बेल यांच्या इंग्लिश आवृत्तीत सुरा परंपरागत क्रमाने देण्यात आल्या आहेत. तसेच त्याने सबंध पुस्तकाच्या कालानुक्रमासंबंधी अगदी तपशीलवार नोंद करून ठेवली आहे. बेल याचे ते पुस्तक एकंदरीतच फार सरस झाले आहे. या सर्वांमुळे सुरांच्या तपशिलाबाबत मतभेद असले तरी देखील ज्यांच्या कालखंडाविषयी सर्वसाधारण एकमत झालेले आहे. अशा सुरांच्या आणि श्लोकांच्या काहीशा मर्यादित संग्रहावरून पैगंबराच्या अगदी सुरवातीच्या संदेशासंबंधीचा अभ्यास करणे आता शक्य झाले आहे. अर्थात अशा सुरांच्या तपशिलाबाबत अद्यापही गंभीर स्वरूपाचे मतभेद आहेत. प्रस्थापितांची आत्मसंतुष्टता आहे ही परिस्थिती टिकून राहण्यातच सर्वांचे भले आहे अशी त्यांची समजूत, पुरातन कालापासून चालत आलेल्या त्यांच्या सवयी आणि रीतिरिवाज, त्यांना प्रिय असणाऱ्या जगापुढे आ वासून उभ्या असणाऱ्या संकटांविषयी त्यांना वाटणारी बेपर्वाई आणि कोणी कितीही इशारे दिले तरी त्याबद्दलची त्यांची तुच्छता याबद्दल त्यांना यत्किं-चितही खंत वाटू नये या सगळ्याबद्दलचा राग क्रांतिकारकांनाच नव्हे तर सुधारकांना देखील दुसऱ्या कशानेही येत नसेल. स्वतःचे सामर्थ्य गृहीत धरून चालणारे आणि भरपूर संपत्तीचा संग्रह करून बसलेले आणि कशाचाही मुलाहिजा न ठेवता आपण मन मानेल तसे वागू शकतो अशी समजूत करून घेणारे जे लोक असतात त्यांच्यावरच अगदी सुरवातीच्या साक्षात्कारांचा रोख आहे. ते किती क्षुद्र आहेत ते अल्ला त्यांच्या दृष्टोपत्तीस आणून देतो.

आम्ही निर्माण केलेला माणूस सदैव अडचणीत असतो.
त्याच्यावर कोणाचीही सत्ता चालणार नाही.
अशी का त्याची समजूत असते?







तो म्हणतो, मी अपार श्रीमंती उधळून टाकलेली आहे.
आपल्याला कोणी पहात नाही असे का त्याला वाटत असते?

(कुराण XC, ४-७)

शुक्राच्या थेंबापासून निर्माण झालेले आपले जीवन हे क्षणभंगुर असून त्याचा विनाश होणार हे ठरलेले आहे हे या लोकांना दिसत नाही का?

संभ्रमित मानव! तो किती कृतघ्न आहे.
ईश्वर त्याला कशापासून निर्माण करतो?
एका थेंबातून त्याने त्याला निर्माण केले
आणि त्याचे भवितव्य ठरवून दिले.
नंतर त्याने त्याच्यासाठी त्याचा मार्ग घालून दिला.
नंतर त्याने त्याचा मृत्यू घडवून आणला.
आणि त्याला थडग्यात पाठवले.

(कुराण lXXX १६-२१)

अल्लाच्या ऐश्वर्यापुढे मानव हा किती क्षुद्र जीव आहे !
(पृथ्वीवरील) सर्व नाशवंत आहे.
परंतु तुमच्या प्रभूचा चेहरा मात्र
परमपद प्राप्त आणि पूज्य असाच राहणार आहे.

(कुराण V, २६-२७)

सर्व वस्तुजात हे अल्लानेच स्वतःचे वर्णन सतत 'तुमचा प्रभू' म्हणून तो करतो) निर्माण केले आहे. आणि तो या क्षणालाही 'प्रतिदिनी कसल्या ना कसल्या कामात व्यग्र असतो.' (lV,२९) स्वर्ग, सूर्य, चंद्र, पृथ्वी आणि सागर, पर्वत ही सारी त्याचीच निर्मिती आहे. ज्याच्यावर माणसाची गुजराण होते ती उद्‌भिज-कोटी ही त्याचीच सनातन किमया आहे :

माणसाने आपल्या अन्नाचा विचार करावा.
आम्ही पावसाच्या सरी पाडतो,
जमिनीला भेगा पाडतो,
त्यातून धान्याचे अंकुर फुटतील असे करतो,
द्राक्षवेली आणि हिरवीगार झुडपे,
बदाम आणि ताड,
आणि समृद्ध फळबागा
फळझाडे आणि कुरणे
तुम्हाला आणि तुमच्या कळपांना आनंद उपभोगता यावा (म्हणून आम्हीच निर्माण करतो.)

(कुराण LXX २४-३२)

परंतु अन्य कशापेक्षाही, त्याच्या सामर्थ्याची प्रचीती कधीही न सुटणारे प्रजोत्पादनाचे जे गूढ आहे त्यावरून येते. अगदी पहिल्याच पठणात त्याचा उल्लेख आहे :

निर्मिती करणाऱ्या तुमच्या प्रभूच्या नावाचे स्तवन करा त्याने रक्त-ग्रंथीतून माणूस निर्माण केला.

(कुराण XCVI, १-२)

ह्या विषय पुढे अनेकदा आला आहे :

आपली निर्मिती कशातून झाली त्याचा माणसाने जरा विचार करावा.
कटिभाग आणि फासळी यामधुन निघणाऱ्या द्रव पदार्थापासून तो निर्माण झालेला आहे.

(कुराण XXXVI ५-७)

तेव्हा मनुष्य आणि अदृष्य शक्ती म्हणजेच जिन्स ही त्याचीच निर्मिती आहे. तोच त्यांचा भाग्य विधाता असतो. माणसाच्या उपयोगी पडणारे प्राणी—ज्यात उंटाचा नंबर पहिला लागतो — हे देखील त्यानेच निर्माण केलेले आहेत. तोच त्यांच्याकडून चलन वलन करवून घेतो.

समुद्रावर पर्वतासारखी उंच दिसणारी जहाजे (कुराण LV, २४)
यासारखी दृष्ये आपण पहातो ती त्याच्यामुळेच.

आणि कुरेशाइटांची खाजगी मते काहीही जरी असली तरी साहसी प्रवासात त्यांना जे यश प्राप्त झाले त्याचा धनी तोच आहे।

कुरेश बरोबरच्या करारासाठी
त्याचप्रमाणे उन्हाळ्यातील आणि थंडीतील त्यांच्या काफिल्यासाठी
त्यांना या मंदिरातील ईश्वराची उपासना करू द्या— (कारण) त्यानेच त्यांच्या भुकेचे निवारण व्हावे म्हणून तरतूद करून ठेवली आहे आणि त्यांना भय मुक्त केले आहे.

(कुराण CVI )

आणि म्हणून गरीब आणि निराधार यांचा कैवारी असलेल्या महंमदानें तो त्यांच्यापैकीच एक होता.— कुरेशाइटांना नावे ठेवली आणि त्यांचा तिरस्कार केला. ज्याची सत्ता कुरेशाइटांचा बीमोड करू शकते. अशा सत्-तत्वाच्या नावाने तो हे करतो. चिंतन, संभाषण, आणि अनुभव यांच्या योगे ईश्वर आणि त्याचे सामर्थ्य जाणून घेण्यास तो शिकला होता त्यांच्याकडे नुसते बोट दाखवून त्याचे समाधान होणारे नव्हते. तो त्यांच्याबद्दल दहशतही

निर्माण करतो. कोणता मार्ग अनुसरावा ते ईश्वराने मनुष्याला दाखवून दिले. आहे

आम्ही त्याला दोन मार्ग दाखवलेले नाहीत काय ?

(कुराण xc-१०)

परंतु महंमदाच्या डोळ्यासमोर जी माणसे होती त्यांनी हा अवघड चढणीचा मार्ग अव्हेरला होता. ते असे मानीत की, एकदा हे जिवित संपुष्टात आले कि, सर्व काही संपून जाते आणि त्यामुळे त्यांनी करावयाचे ते इतकेच की, जोपर्यंत असे तोपर्यंत मौज मजा करावयाची फक्त एकच गोष्ट लक्षात ठेवायची की, आपल्या प्रतिष्ठेला धक्का लागू द्यावयाचा नाही. पण यामुळे अंतिम काळ येईल आणि मृत्यू अपरिहार्यपणे त्यांच्या नशिबी येईल. त्यांच्या मते देव स्वर्ग आणि पृथ्वी यांच्या दरम्यान कोठे तरी रहात असले आणि संचार करीत असले तरी एकच एक असा ईश्वर जन्माला आलेला नाही आणि त्याने माणसाला खूप मुभा ठेवलेली आहे. आता महंमद असे सांगत होता की मृत्यू हा काही अंतिम शेवट नाही. त्यामुळे त्यांनी म्हणजे या अहंमन्य श्रीमंतांनी अशी जाणीव ठेवावी की, एक दिवस अद्भुतपणे त्यांचे पुनरुत्थान होऊन त्यांना घोर व भीतीदायक निवाड्याला सामोरे जावे लागणार आहे.

ज्या वेळी आकाश विदीर्ण होईल

आणि ईश्वराचा आवाज मुकाट्याने ऐकून घ्यावा लागेल.

(Lxxxiv १-२)

ज्यावेळी तुतारी वाजेल

तो दिवस महाभयानक ठरेल

जे नास्तिक असतील त्यांना तो असह्य ठरेल.

कुराण (xxiv ८-१० )

अग्नीचे आणि वितळलेल्या पितळाचे स्रोत

तुमच्यावर कोसळतील आणि तुम्हाला कोणाचे सहाय्य मिळणार नाही.

ज्यावेळी आकाश फाटून लाल कातड्यासारखे किरमिजी बनेल .....

त्यावेळी मानवाला किंवा राक्षसाला

त्यांच्या पापांचा जाब विचारला जाणार नाही.

जे पापी असतील ते त्यांच्या खुणांवरुन

ओळखले जातील, त्यांची पुढची झुलपे

आणि पाय त्यांना ओढले जाईल.

कुराण lv ३५-४१)





त्यानंतर हे पापी लोक भयावक आग आणि अर्थात उकळते पाणी यात गरगरत राहतील. (lv ४४). या उलट आपल्या ऐहिक जीवनात जे अल्लाला भिऊन वागले असतील त्यांची रवानगी दोन उद्यानांत केली जाईल. या दोन बागा दाट हिरव्या पर्णसंभारांनी समृद्ध असतील. त्यांत पाण्याने भरलेले दोन निर्झर वहात असतील. तसेच त्यात ताड, डाळिंब आणि सर्व प्रकारच्या फळ झाडांची रेलचेल असेल. त्याठिकाणी सहज हाताशी लागणाऱ्या फळझाडांच्या शाखांच्या खाली मऊ हिरवळीवर ही खास मर्जीतील माणसे पहूडतील आणि प्रवाळ आणि माणिक यांच्यासारख्या सुंदर आणि विनम्र दृष्टी असलेल्या मानवी स्पर्शाला अनोख्या असलेल्या आणि निरनिराळ्या तंबूत ठेवलेल्या अक्षता युवतींचा ते उपभोग (अर्थात शब्दाच्या पूर्णार्थाने) घेतील. पोक्त पहिली दोन लग्ने झालेल्या खादिजाच्या उत्कंठित पतीला ईश्वराने खालील आश्वासने द्यावी हे समजण्यासारखे आहे.

तुमचे भावी जीवन अगोदरच्या जीवनापेक्षा चांगले असेल. (कुराण xciii ४) तथापि महंमदाला या कल्पना सुचल्या तरी कशा? याच्याबद्दल सार्वत्रिक संशय व्यक्त केला जातो. असे पूर्वीचे कवी आणि भविष्यवादी यांना आलेल्या अनुभवासारखेच शंकास्पद असे जे दृष्टांत आणि अवस्तुभ्रम महंमदाला होत असत, त्यावरूनच केवळ त्याला हे सुचले असेल का? तसे म्हणता येणार नाही. त्यावेळेपर्यंत अरबांना उपलब्ध न झालेल्या परंतू जगातील बलाढ्य राष्ट्रांतील अत्यंत सुसंस्कृत जनतेचा ज्यांच्यावर विश्वास होता अशा उत्तमोत्तम धर्मग्रंथातून त्याला याबाबत भक्कम आधार मिळालेला होता. अगदी सुरवातीपासूनच महंमदाला ईश्वराकडून जे संदेश येत त्यातून खालील आवाहन केलेले आहे.

ज्याने रक्ताच्या ग्रंथीतून माणसाला निर्माण केलेल्या तुमच्या प्रभूचे स्तवन करा—
म्हणा, तुमचा प्रभू हा अत्यंत उदार आहे.
मेंढपाळांच्या गाण्यातून त्याने शिकविले आहे,
मानव प्राण्याला ज्या गोष्टी आजवर माहीत नव्हत्या. त्या त्याने शिकवल्या आहेत (कुराण xcvi १–५)

अरबी भाषेतील कलम (ग्रीक भाषेत कलामॉस (Kalamos) असा शब्द आहे) याचा अर्थ सुरवातीच्या प्रेषितांना झालेले दृष्टांत जिने त्या लेखणीने कशावर तरी लिहून घेतलं जात ती लेखणी
निर्मल आणि शुद्ध केलेल्या

सन्मानित पृष्ठावर
उदात्त आणि गुणी
धर्मशास्त्र वेत्याच्या हातांनी हे संदेश लिहून ठेवले आहेत
(कुराण lxxx १३-१५)

तेव्हा मग त्यांच्या नशिबी येणाऱ्या नरक-यातनांतून सुटण्यासाठी माणसांनी काय करावे? त्यानी स्वतःला शुद्ध ( तझाक्का ) करावे म्हणजे नीतीने वागावे. नैतिक दृष्ट्या न्याय्य आयुष्य कसे त्याची व्याख्या करताना कुराणाच्या अगदी जुन्या उताऱ्यातून जवळ जवळ एकच निकष सांगितला आहे. तो म्हणजे संपत्तीचा योग्य उपयोग करणे. केवळ श्रीमंतीसाठी संपत्तीचा संचय करता कामा नये तर त्यातील काही भाग गरिबांना देऊन टाकला पाहिजे.

अशा तऱ्हेने जो दान करतो आणि दया दाखवतो आणि जो सर्वोत्तमाच्या ( इनाम ) सत्यत्वाची ग्वाही देतो. ( त्याच्या ) अंतिम सौख्याचा मार्ग आम्ही सुकर करतो.

आपल्या संपत्तीच्या योगाने जो क्षुद्र आणि घमेंडखोर (बनतो) (आणि)
सर्वोत्तम (इनाम) नाकारतो.
त्याला आम्ही अंतीम दुःखाचा मार्ग दाखवतो
तो ज्यावेळी खोल गर्तेत जाईल त्यावेळी त्याची संपत्ती त्याच्या कामी येणार नाही.
(कुराण xcll ५-११)

स्वार्थी श्रीमंताची सर्व प्रथम निर्भत्सना केली आहे :
सावधान ! तुम्ही अनाथांची इज्जत करीत नाही.
त्याचप्रमाणे गरिबांना खाऊ घालण्याची तळमळही तुम्हाला नसते.
लोभीपणाने तुम्ही (दुर्बळांची) मिळकत घशाखाली घालता,
आणि संपत्तीचा तुम्हाला अतोनात हव्यास असतो.
( कुराण lxxxix १८-२१)

या उलट न्यायी माणसाची वर्तणूक त्याच्या हयातीत अशी असते,

ते रात्री फार थोडा वेळ झोप घेत असत. पहाट झाल्या बरोबर (ईश्वराची) करुणा भाकण्यासाठी ते प्रार्थना करीत असत त्यांच्या जवळच्या सामानात ते भिकारी आणि निराधार यांना सहभागी करून घेत.
(कुराण li १७-१९)

सुरवातीच्या दृष्टांतामधून इतरांना लागू पडेल अशी आचार संहिता खुद्द महंमदाला घालून देण्यात आली होती :



अनुक्रमणिका



( ईश्वरी ) प्रावरणाने आच्छादिलेला असा तू
ऊठ आणि इशारा दे !
तुझ्या प्रभूची वाखाणणी कर.
तुझी वस्त्रप्रावरणे शुद्ध कर.
सर्व प्रकारचे मालिन्य (किंवा बहुधा क्रोध) झटकून टाक.
भरपूर दान करण्याला मागे पुढे पाहू नकोस.
शांतपणे तुझ्या प्रभूची प्रतीक्षा करीत रहा.

( कुराण lxxiv १–७ )

परंतु इशारा देण्याचे हे फर्मान फक्त त्यांच्यासाठीच होते. त्याच्या प्रभूने ही मुख्य कामगिरी त्याच्यावर सोपविली होती. परंतु नंतरच्या दृष्टांतानुसार त्याला जितके महत्व प्राप्त झाले तितके ते यावेळी झालेले नव्हते. तथापी महमंदाला आधीच एक विशेषाधिकार प्राप्त झाला होता. त्याच्या मनातील त्या काळच्या शंकांबाबत त्याला एक आश्वासन मिळाले होते :

लखलखीत सकाळी
रात्रीच्या साम्राज्यात आणि तुझ्या प्रभूने तुझा अव्हेर केलेला नाही, त्याच-प्रमाण तुझा तिरस्कारही केलेला नाही.
तुझ्या पहिल्या आयुष्यापेक्षा तुझे भावी आयुष्य अधिक चांगले असेल.
शेवटी तुझा प्रभू तुला (इतके) देणार आहे–की, खरोखरी तुझे समाधान होईल.
निराधार अवस्थेत असताना त्याने तुला आसरा दिला नाही कां ?
तू चुका करीत असताना तुला मार्ग दाखविला नाही कां ?
तू गरीब असताना त्याने तुला सधन बनविले, आणि तू याचना करीत असताना त्याने तुला विन्मुख पाठवले नाही.
तुझ्या प्रभूच्या चांगुलपणाबद्दल निरुपण कर.

(कुराण xciii)

यावरून हे स्पष्ट होते की, इशारा देण्याच्या या कर्तव्याबरोबरच काही मर्यादित विशेषाधिकारही प्राप्त होतात. हे विशेषाधिकार म्हणजे ईश्वराकडून विशेष लक्ष पुरविले जाणे हे होत. त्याचप्रमाणे काही जबाबदारीही येवून पडते दूरवर्तनी माणसाची ईश्वराकडून निर्भत्सना होते. अशा दुर्वर्तनी माणसाचे स्वरुप मोठे मजेदार आहे. एक आंधळा, अर्थात तो गरीब तर खासच होता आणि बहुधा भिकारीही असावा एकदा महंमदाला शोधत आला. त्यावेळी महंमद एका महत्वाच्या माणसाबरोबर चर्चा करण्यात गुंतला होता. तो माणूस







म्हणजे अल्लाच्या मदतीशिवाय आपण काहीही साध्य करू शकतो असे मानणाऱ्यांकी एक मांडखोर श्रीमंत होता. महंमद त्याचे मन वळवण्याच्या खटपटीत होता. अशा वेळी त्या आंधळ्या माणसाने महंमदाच्या मागे पौर्वात्य देशांतील भिकारी लावतात तसे एकसारखे टुमणे लावले होते. शेवटी महंमदाचा संयम सुटला आणि कपाळाला आठ्या घालून रागाने त्याच्याकडे पाहून त्याने त्याला खडसावले. येथे काही काळ का होईना पण त्याचा संयम सुटला याबद्दल तो स्वतःला दोष देत आहे आणि त्याबद्दल चिंता व्यक्त करीत आहे हे उघड आहे. उच्च वर्गातील सुधारक देखील, आपल्या जुन्या सवयीनुसार ज्यांच्या संगतीत राहणे हे वस्तुतः त्यांचे कर्तव्य ठरले असते त्यापेक्षा आपल्या सारखेच जीवन जगणाऱ्याच्याच संगतीत राहणे, महंमदाच्या वेळेपासून पसंत करीत आलेले आहेत. त्यामुळे साहजिकच जे दृष्टांत होतात त्यांत सद्सद्विवेक बुद्धीला वरून कोणीतरी एक प्रकारची टोचणी लावीत असल्याचे दिसते :

ज्यावेळी तो आंधळा माणूस त्याच्याकडे आला
त्यावेळी त्याने त्याच्याकडे तिरस्काराने पाहिले आणि पाठ फिरवली.
तुला हे कसे कळणार की कदाचित
त्यामुळे त्याची स्वतःचीच शुद्धी होणार होती ?
किंवा कदाचित त्यामुळे त्याचे मार्ग सुधारले असते आणि पुढे त्याचा फायदा झाला असता ?
परंतु आत्मसंतुष्ट श्रीमंताकडे तू सर्व लक्ष पुरविलेस.
इतके करुनही त्याने स्वतःची शुद्धी करून घेतली नसती तर तो दोष तुझा ठरला नसता.
उलट जो अपेक्षेने आणि भीतीयुक्त अंतःकरणाने तुझ्याकडे येत होता त्याच्याकडे तू दुर्लक्ष केलेस.

(कुराण lxxx १-१०)

आपल्याला आपल्या प्रभूकडून संदेश मिळाला आहे अशी महंमदाला निःसंशयपणे खात्री वाटत होती. त्या संदेशाचा आशय हा असा होता. त्या संदेशातील कल्पना किंवा विचार आद्यवत कितपत होते म्हणजे त्यांची मांडणी प्रथमच झाली होती किंवा काय संबंधीची चर्चा पुढे येणार आहे परंतु त्या संदेशाचे स्वरूप तरी अगदी निराळे किंवा असामान्य होते का ? यातून अनेक महत्वाचे प्रश्न उद्भवतात.

इस्लामच्या आधीचे अरबी भाषेतील गद्य आपल्याला उपलब्ध नाही.



अनुक्रमणिका

अरबी भाषेच्या अभिजात वाङ:मयाचे परिशी लन केले तर असे आढळून येते की, त्यात सुरुवातीला फक्त काव्यच होते. त्या वाङ.मयांत एकदम एका नव्या वाङमय प्रकाराची सुरवात व्हावी. कोठलीही पूर्वपीठीका किंवा तयारी नसताना त्याची सुरवात व्हावी आणि त्यातही अरबी लोक जो वाङ.मयप्रकार पूर्णत्वास पोहोचलेला आहे असे मानतात. असा एकादा वाङ.मयप्रकार त्या साहित्यात एकदम उदित व्हावा ( किंबहुना अशा वाङ.मयप्रकाराचा एक तेजस्वी समुच्चय निर्माण व्हावा ) ही खरोखर एक अद्भूत घटनाच म्हटली पाहिजे. त्यावाचून त्याची दुसरी संगतीच लावता येत नाही. त्या वाङ.मय प्रकारात जे शब्द किंवा वाक्यप्रयोग आढळतात ते दैवी ( अपौरुवेय ) असल्याचाच हा पुरावा आहे असे मुस्लीम धर्माचे अनुयायी मानतात. महंमद हा तसे पाहिले तर एक अगदी सर्वसामान्य माणूस होता आणि त्याच्या अंगी कोठल्याही तऱ्हेचे साहित्यिक गुण नव्हते असेही ते दाखवून देतात. म्हणजे त्यांना असे सुचवावयाचे असते की, असे असून ही त्याच्या तोंडून असे संदेश निघतात त्याअर्थी ते दैवीच असले पाहिजेत.

धार्मिक किंवा निधर्मी विषयावरील तात्विक चर्चेच्या वेळी नेहमीच हा सिद्धांत पुढे मांडला जातो आणि तो अबाधीत असल्याचे ठासून प्रतिपादन केले जाते. परंतु वस्तुत: एका चुटकीसरशी त्याचा फोलपणा सिद्ध करता येण्यासारखा आहे. जगात सगळीकडेच गद्य वाङ.मय हे काव्यानंतरच प्रसूत झालेले असून अरबस्तान ही त्याला अपवाद नाही. कुराणातील गद्य हे अगदी विशेष प्रकारचे असून खुद्द अरब लेखकही असे सांगतात की, त्याच स्वरुपातील निरूपण कुराणाच्या आधीपासून प्रचलित आहे. परंतु हा वाङमय प्रकार पूर्वी लिखित स्वरूपात नसे. ते लिहून घेण्यासाठी किंवा मुखोद्गत होण्यासाठी ( आणि विशेषतः सुरूवातीला तरी निदान त्यापैकी काही भागच ) त्याला विशिष्ट प्रकारचा प्रसाद असणे आवश्यक होते. जवळपास त्याच धाटणीचे अन्य उतारे लिखित स्वरूपात जतन करुन ठेवावे असे वाटण्यासारखे त्या उताऱ्यात काही नव्हते, आणि तरीही त्यापैकी काही लिहून घेतले असले तरी पुढे इस्लामच्या विज-याची जो घोडदौड सुरु झाली त्यामुळे तो ठेवा इतरांच्या हवाली केला गेला नाही इतकेच नव्हे तर त्यांच्या सर्व दप्तरनोंदीही नष्ट करुन टाकण्यात आल्या.

कुराणाची भाषाशैली आदर्श आहे अशीच मुळी इस्लामधर्म मानणारांची श्रद्धा असते. कारण तशा तऱ्हेचे लिखाण अन्य कोणीही करुच शकणार नाही अशी त्या धर्माची शिकवणच आहे. अनेक धर्मशास्त्रवेत्ते इतराच्या या असमर्थतेवर ( इंजपझ ) फार भर देतात. त्यावरुन त्यांनी निरनिराळे सैद्धांतिक

निष्कर्षही काढले आहेत.

परंतु कुराणाचा मूळ पाठ अतुलनीय असा जो दावा केला जातो त्या-संबंधी शंका घेणाऱ्या स्वतंत्र प्रज्ञेच्या व्यक्तींची इस्लामी धर्मात कमतरता नाही. त्यापैकी काहींनी तर कुराणाची सहीसही नक्कल करणारे लिखाण केले आहे. मध्ययुगात लिहिल्या गेलेल्या अशा तऱ्हेच्या एका नकली कुराणावर ज्यावेळी असा आक्षेप घेण्यात आला की, मूळ कुराणाच्या पठणाने मोहिनीविद्येने होणाऱ्या परिणामासारखा परिणाम तुझ्या कुराणाने येत नाही त्यावेळी त्या लेखकाने असा टोला लगावला की, " मशिदीमधून शतकानुशतके याचे पठण करून पहा म्हणजे काय ते दिसेल " यातील खरे इंगित येथेच आहे. ज्या मूळ पुस्तकाची संथा अगदी लहानपणापासून देण्यात आलेली असते आणि अत्यंत तळमळीने ज्य.चे पठण भावगंभीर वातावरणात एकसारखे कानावर पडत गेलेले असते आणि ते अगदी शब्दशः मुखोद्‌गत केल्यामुळे जीवनाचा एक भागच बनून गेलेले असते त्याची काही कालानंतर एक विशिष्ट प्रकारची प्रतिक्रिया त्या व्यक्तीच्या जीवनावर घडून येत असते. त्यामुळे त्याकडे नव्या दृष्टीने पहाणे किंवा नवीन स्वरूपात ते श्रवण करणे अशक्य होऊन बसते. कुराण पठनाशी निगडीत असलेल्या नित्याच्या बाबी बाजूस सारून कसलीही पूर्व कल्पना न देता मुळातील पाठ वाचले तर त्याचे परिणाम काय घडून येतील ते सांगता येणार नाही. पवित्र ग्रंथातील काही उतारे किंवा त्यातील काही स्तोत्रे पूर्व सुचना न देता आपल्याला प्रथमच वाचायला दिल्या तर त्या आपल्या कानाला कशा वाटतील ते सांगता येणे अशक्य आहे. धर्मग्रंथातील काही उतारे आणि लॅटिन स्तोत्रे यांच्या बाबतीत कॅथॉलिकांची आणि एकूण सर्वच बायबलाच्या बाबतीत प्रॉटेस्टंटांची अशीच अवस्था असते. त्यामुळे मूळ कुराण हे पूर्णत्वाला पोहोचलेले असून त्याच्याशी अन्य कशाचीही तुलना होवू शकत नाही असा मुस्लिमांना विश्वास वाटावा इतकेच नव्हे तर त्याबाबत कोणी शंका घ्यावी हे देखील त्यांना आश्चर्यजनक वाटावे आणि त्याबद्दल त्यांचा संताप व्हावा हे अगदी साहाजिक आहे. त्याचप्रमाणे संबंधित धर्मग्रंथाचेच ज्यानी सुरवातीपासून पठण केले आहे त्यांना त्यात इतके कौतुकास्पद असे काय वाटते याचे तो ग्रंथ प्रथमच वाचणाऱ्या बिगर मुसलमानांना आश्चर्य वाटणेही तितकेच साहजिक आहे.

त्यामुळे ज्यांच्यावर या ना त्या कारणामुळे कुराणाविषयी साकल्येकरून छाप पडलेली नाही असे लोक कुराणाच्या सौंदर्याविषयी वाद घालीत असतात. मध्य युगात स्वतंत्र विचाराच्या अनेक मुसलमानांनी मुआरअदत अल् कुराण या







नावाची पुस्तके लिहिली आहेत सर्व साधारणपणे कुराणविरोधी असाच त्याचा अर्थ होतो. अर्थातच कुराणाच्या पुरस्कर्त्यांना विशेषत: वाङमयीन पातळीवरून त्या पुस्तकांचा प्रतिवाद केला पाहिजे असे वाटले इतकेच नव्हे तर कुराणातील निरनिराळे मुद्दे आणि शब्द घेऊन त्याची शैली आणि त्यातील प्रतिमा किंवा दृष्टांत यांचे परिश्रमपूर्वक समर्थन केले पाहिजे असे अत्यंत उत्कटतेने वाटले. अगदी आपल्या काळातही सेमेटिक भाषा पंडित आणि अरबी भाषेचा विद्वान अभ्यासक थिओडोर नोल्डेक याने कुराणाच्या शैली संबंधीचे दोष दाखवून देणारा एक विस्तृत लेख लिहिला आहे.

साहित्यिक कलाकृती निर्माण करावी असा महंमदाचा अजिबात हेतू नव्हता. तो ज्या अनुभूतीच्या शोधात होता आणि जी त्याला प्राप्त होत गेली ती आपण वर पाहिल्याप्रमाणे सुरवातीला अस्फुट स्वरूपातीलच होती. शब्द मागाहून येत गेले आणि त्यानंतर त्याला जो अनुभव येत गेला तो निदान याबावतीत तरी लेखकाला येणाऱ्या स्फूर्तीसारखा होता. म्हणजे लेखकाला ज्याप्रमाणे नुसते शब्द वाचकापर्यंत नेऊन भिडवावयाचे नसतात तर त्यात अभिप्रेत असलेला सर्व आशय इतरांना समजावा असे त्याला वाटत असते. तसाच प्रकार महंमदाच्या बाबतीतही होता. या बाबतीत अतिवास्तववादी (स्युररिॲलिस्टिक ) लेखकांच्या स्वयंचलित लेखनापेक्षा कुराण निराळे असले तरी इतर बाबतीत मात्र कुराणाचे त्यांच्याशी साम्य आहे. माणसाला ज्यावेळी स्फूर्ती येते त्या क्षणाचे वर्णन आंद्रेब्रेताँने केले आहे. ज्यावेळी माणूस स्वत: कसल्या तरी विलक्षण भावनावेगाने झपाटला जातो त्यावेळी तो त्याच्या स्वत:च्या इच्छेविरुद्ध एका अधिकसमर्थ शक्तीकडून अमरत्वाकडे रेटला जात असतो. याठिकाणी त्याला अमरत्व म्हणजे भविष्यवाणी असा अर्थ अभिप्रेत आहे याबद्दल काही शंका नाही. ' क्युमे, डोडोना आणि डेल्फी येथील कौल देणाऱ्यांना अतिवास्तववाद्यांच्या आवाहनामुळे धक्का बसला. परंतु अतिवास्तववाद्यांचे आवाहन म्हणजे तर मी स्वत:शीच गुणगुणलेले अत्यंत मवाळ असे शब्द होते ' त्या आवाजाने महंमदाच्या तोंडून ज्याचा उच्चार करवून घेतला त्यात मधोमध दोन तुकडे झालेला असा एक माणूस खिडकीपाशी आहे' अशासारखे शब्द प्रयोगच केवळ नसत. तर सुसंबद्ध असे संदेशही त्यात असत. वरील विवेचनावरून असे दिसून येईल की, महंमदाच्या तोंडून निघणाऱ्या अस्फुट आणि तुटक तुटक शब्दांबरोबरच निदान मूलत: तरी साक्षात्कारी प्रकटी करणही होत असे. मी प्रतिपादन केलेल्या ' नादमय काव्याच्या ' गृहीत कृत्यांशी या परमोच्च कोटीच्या प्रकटीकरणाचे साम्य असल्याचे दिसून येते.



अनुक्रमणिका



उदाहरणार्थ सुरवातीच्या ख्रिस्ती समाजातही अशीच परिस्थिती होती. त्याला ते 'जिव्हेने बोलणे' म्हणजे ग्रीक भाषेत 'ग्लॉसोल्लिया' असे म्हणत असत. सेंट पॉल जे अधिकारी पुरुष असतील त्यांना 'जिव्हेने बोलण्याची' परवानगी द्यावी असा सल्ला देत असे. कोरिंथच्या ख्रिश्चनांना त्यांने असे लिहिले होते की, तुमच्या सर्वांच्यापेक्षा मी जिव्हेने जास्त बोलतो.

प्राद्रे ग्रेतपिक्षा महंमद हा पॉलच्याच बाजूचा होता. पॉल हा त्याला लाभलेल्या अतिवास्तवाच्या गुणविशेषांवर ताबा ठेवण्याचा जाणीवपूर्वक प्रयत्न करीत असे.

'तरी देखील अज्ञात अशा भाषेतील हजारो शब्दांपेक्षा मला समजलेल्या मोजक्या पाच शब्दांत मी चर्चमध्ये इतरांना अधिक शिकवू शकेन.'

आणि त्याने पुढे आणखी असे म्हटले आहे. (कोरिंथिअन्स xiv २-३)

जो अज्ञात भाषेतून बोलतो तो माणसांशी बोलत नाही तर ईश्वराशी बोलत असतो. कारण कोणत्याही माणसाला तो काय बोलतो ते समजत नाही; तथापी ते कसेही असले तरी तो गूढ बोलत असतो. परंतु जो भविष्यवाणी वर्तवीत असतो त्याचे बोलणे पारमार्थिक, उपदेशपर आणि सुखकर असते.

महंमदाला देखील अजाणतेपणाने का होईना, त्याला स्फुरणाऱ्या उद्गारांची निवड करून त्यातील काही गाळून टाकून जे पारमार्थिक उपदेशपर आणि सुखकर असतील त्यांचाच आधार घ्यावा लागत असे. त्याच्या सर्वोत्तम कविता या बहुधा कधी उतरूनच घेतल्या गेल्या नसाव्यात. विशिष्ट सज्ञेचे संदेश ईश्वराकडून येतील अशी तो अपेक्षा करीत असे आणि या अपेक्षेतून जे शब्द बाहेर पडत ते 'स्वतःहूनही सामर्थ्यशाली' बनण्याचा अयशस्वी प्रयत्न करीत. जिव्हेने बोलणाऱ्या ख्रिश्चनांव्यतिरिक्त महान यहुदी प्रेषितांचीही अशीच परंपरा असल्याचे त्याला नव्याने आढळून आले.

त्यामुळे त्याचे शब्द शुद्ध काव्याच्या स्वरूपातील नसत. त्याचप्रमाणे खऱ्या अर्थाने त्याला वाङ्मय म्हणूनही संबोधता येणार नाही. रेगिस ब्लेचरने दाखवून दिल्याप्रमाणे आपल्या माध्यमावर त्याचे प्रभुत्व नव्हते. किंवा अधिक यथार्थतेने बोलावयाचे तर, त्यापैकी काही भागावरच आणि तेही अजाणतेपणाने प्रभुत्व मिळविण्यात तो यशस्वी झाला होता. वाळवंटातील कवी ज्याप्रमाणे त्यांच्या काव्याची शैली आणि आशय यामुळे ख्यातनाम झाले होते तसे एखादे काव्य रचण्याच्या तो अजिबात प्रयत्नात नव्हता. परंतु कवी काय किंवा प्रेषित काय यांच्या प्रमाणेच महंमदाचा व्यक्तिगत अनुभव आणि इतरांपर्यंत पोहोचविता न येणारा परमोच्च क्षण, केवळ सत्ती येणारा

त्या चा शब्दातीत असा व्यक्तिगत संपर्क हे सर्व मुव्हवरथींत अशा भाषेच्या स्वरूपात आधीच व्यक्त होवू लागले होते. इतरांशी संवाद साधणे हा त्या-मागील प्रमुख हेतू होता आणि त्यातील शैलीचे सौंदर्य नजरेत भरण्यासारखे होते. निदान सुरवातीला तरी आपोआपच तो जसा संदेश होता तसेच ते काव्यही होते. त्याचे कारणही पुन्हा हेच होते की, ज्याच्या मुखातून तो आवाज बाहेर पडत होता. त्याच्या अबोध मनात साचून राहिलेले आदर्श त्याद्वारे व्यक्त होत होते, आणि काहीन् म्हणून ओळखल्या जाणाऱ्या भगताच्या भाषेच्या रूपाने तो आवाज प्रकट होई. स्वर्गीय जीवांचा धावा करताना जी नेहमीची ठरीव ठशाची पद्धती अवलंबिली जाते तिचाच तो अंगिकार करीत असे परंतु त्याहीपेक्षा महत्वाची गोष्ट अशी होती की, लय आणि बोली भाषेच्या गरजेनुरूप स्वीकारावे लागणारे लयीसंबंधीचे नियम यांचाच तो आश्रय घेत असे. अरबी भाषा ही बहुधा उत्स्फुर्त काव्याच्या विकासाला सर्वात सोयीची आहे. त्या भाषेत सारख्याच घाटणीची शब्दसंपत्ती विपूल असून एकाच व्यंजनावर विरामचिन्हांच्याद्वारा कमी जास्त आघात केल्याने पर्यायी शब्द सिद्ध होतात. अशा तऱ्हेच्या स्वरयमकामुळे यमकात्मक शब्दांची निवड करण्यास खूप वाव असतो. या कारणास्तव सर्वसाधारणपणे जास्तीत जास्त आठ किंवा दहा अवयवांच्या समान लयकारीच्या यमकयुक्त पंक्तीमध्ये आणि छंदबद्ध घटकात विभागलेल्या गद्याच्या म्हणजे सार्जच्या विकासाला ते पोषक ठरते.

अर्थात काहिनांच्या भाषेच्या बाबतीत असे साम्य आढळत असले तरी आंतरिक प्रेरणने बोलणाऱ्यांकडून म्हणजे कवी किंवा शायर यांच्यापेक्षा आवाज वेगळे स्वरूप धारण करतो. सारख्याच प्रकारच्या शाब्दिक किंवा केवळ अस्तित्ववादी अनुभवापासून सुरवात करून कोठल्याही भागांतील किंवा काळा-तील बहुसंख्य कवींप्रमाणे शायर हा देखील त्याच्या पूर्वसूरींनी प्रदीर्घ काला-पासून अत्यंत कौशल्याने विकसित करीत आणलेल्या मार्गाने जे अनिवेदनीय असे ते पोहचविण्याचा जाणीवपूर्वक प्रयत्न करीत असे. शिवाय अनेक बाबतीत संदेश काव्यबद्ध करण्यासाठी शुद्ध काव्याच्या प्रकाराशी संबंधित नसलेला तोच ठरीव मार्ग शायर अवलंबित असे. यासाठी ज्या प्रकाराचा अवलंब केला जात असे तो प्रकार जटिल असे. एकाद्या परंपरागत वृत्तातील यमक आणि लय साधणाऱ्या दोन अर्ध्या अर्ध्या ओळींची मिळून बनविलेल्या अशा ओळीची कविता असे त्या प्रकाराचे हे स्वरूप असे. या कविता जवळपास ग्रीक, लॅटिन किंवा इंग्लिश कवितांच्या धर्तीच्याच असत शायर हा कलाकार असे किंवा त्यापेक्षाही त्याला स्वत: जवळ आपली हत्यारे असलेला आणि मनाशी आधीच आखून ठेवलेले



अनुक्रमणिका



काम हुकमी पद्धतीने पार पाडण्यास बांधला गेलेला कारागीर असेही म्हणता येईल, आणि आपले अंगीकृत कार्य तडीस नेताना हा कारागीर त्यात स्वतःचे थोडे-फार हृदय आणि मन ओतीत असे आणि मानवी भावनांच्या स्त्रोतांचा उल्लेख करून कधी आपली कवीता जिवंत करण्याचा प्रयत्न करीत असत.

अशा तऱ्हेने ईश्वराकडून येणारे जे संदेश महंमद धारवून धरीत असे ते परंपरागत काव्यापासून जसजसे दूर जात तसतशी विशुद्ध काव्याशी त्यांची अधिकाधिक जवळीक निर्माण होत जाई.

आम्ही त्याला काव्य शिकवलेले नाही किंवा त्याला ते शोभूनही दिसत नाही.
(कुराण XXXvi ६९)

सुरवातीला येणाऱ्या संदेशाच्या काव्यात्मक गुणांविषयी मतभेद असू शकतील, याठिकाणी देखील नव्या दृष्टीकोनांतून त्यांचे सहजासहजी विवेचन करता येणार नाही. त्यातील प्रतिमासृष्टी रूक्ष आणि मनोरंजन विरहित असल्याची टीका केली जाते. परंतू त्याचबरोबर त्यातील शब्दांचा नाद किंवा रेगिस ब्लेचरच्या शब्दात सांगावयांचे तर घणाघाती यमक ' आणि ' लयीची श्वास रोखून धरणारी, धडकती आणि असमान गती ' याने आपण भारून गेल्याशिवाय रहात नाही. कल्पना आणि अभिव्यक्ती यांचे आवर्त, स्वरसाम्य आणि पुनरुक्ती यामुळे, मॅक्स ईस्टमनच्या शब्दांत सांगावयाचे तर, वाचक संमेहित अवस्थेत जातो. म्हणजेच सूचनक्षम अशा उन्मनावस्थेत तो जातो आणि अशा अवस्थेत शब्द, लय आणि प्रतिमा ग्रहण करण्याची त्याची क्षमता नेहमीपेक्षा दसपटीने वाढलेली असते.

परंतु त्याचबरोबर यापूर्वीच सांगितल्याप्रमाणे हे जे संदेश महंमदाला येत असत त्यातील बौद्धिक आशय आणि शिकवणूक व प्रोत्साहन यावर लाद तो आवाजच भर देत असे आणि ही प्रवृत्ती पुढे वाढतच गेली. महंमदाच्या भारावलेल्या श्रोत्यांचे वर्तुळ जसजसे वाढू लागले आणि त्याच्या शब्दाकडे त्यांचे अधिकाधिक लक्ष वेधू लागले व त्यांच्या मनात काहीशी खळबळ माजू लागली तसतशी त्यासंबंधीचे विवरण करण्याची आणि पुढे पुढे कधी त्याचे खंडन करण्याची तर कधी त्यासंबंधी समर्थन करण्याची आवश्यकताही अधिकाधिक भासू लागली. केवळ लोकांच्या भावना हेलावून यापुढे भागण्यासारखे नव्हते. महंमदाला येणारा संदेश मूळात ज्या विशुद्ध काव्याच्या स्वरूपात साकार होत असे ते त्याचे स्वरूप बराच काळपर्यंत तसेच राहिले असले तरी संदेश आता अधिक सुव्यक्त होवू लागला. असे असूनही त्याच्या बाह्य आशयाला वाढते महत्व प्राप्त होणार होते.

त्या संदेशात क्रांतिकारी किंवा धक्कादायक असे काहीही नव्हते—निदान प्रथम दर्शनी तरी तसे वाटत नसे. त्यात कोणतेही महत्त्वाचे असे नवीन धर्म प्रवर्तन असल्याचे दिसून येत नसे. आणि मक्केत त्याला तातडीने मिळणारा प्रतिसाद लक्षात घेता त्याचे जे बाह्य स्वरूप असे त्यालाच महत्त्व असे. आश्चर्याची गोष्ट अशी की, महंमदाचा प्रभू त्याला होणाऱ्या सुरवातीच्या साक्षात्कारांतून इतर देवतांचे अस्तित्व किंवा सामर्थ्य नाकारण्याचा प्रयत्न करताना दिसत नाही. त्यांच्याकडे तो केवळ दुर्लक्ष करतो. त्यापलीकडे त्यांना काही महत्त्व द्यावे असे त्याला वाटत नाही 'जे अल्लाला सहचर आहेत' म्हणून सांगणारांचा, नंतरच्या संदेशातून जसा धिक्कार केलेला आढळतो तसा तो सुरवातीच्या संदेशात आढळत नाही. सर्वोच्च देवतेच्या असामान्यत्वाबद्दलही त्यात आग्रह धरण्यात आलेला नाही. त्या काळात महंमदाचा आणि यहुद्यांचा देव एकच होता. आपल्या ईश्वराची शक्ती अमर्याद आहे अशी महंमदाची श्रद्धा असणे अगदी शक्य आहे. आणि आपल्या ईश्वराबरोबरच इतरही अनेक दुय्यम देवता अस्तित्वात असणे शक्य आहे, परंतु सर्वच बाबतीत त्या देवता त्या सर्वोच्च जगन्नियंत्यावर अवलंबून असल्याने त्या फारशा महत्त्वाच्या नाहीत असा त्याचा विश्वास होता; ईश्वराने निर्माण केलेल्या राक्षसांच्यापेक्षा त्या थोड्याशा वरच्या कोटीतील असतात हे तो उघडपणे मान्य करीत असे हे आपण वर पाहिलेच आहे. इतर सर्व देवांपेक्षा—ज्यांचे अस्तित्व नाकारले जात नाही तर त्यांच्याकडे नुसते दुर्लक्ष केले जाते—एका देवाला श्रेष्ठत्व देणे हे कित्येक अनेक देवतावादी धर्मात सर्रास पहावयास मिळते. त्याला इष्ट देवतावाद असे म्हणतात. अरेबियातील अनेक जणानी हा इष्ट देवतावाद स्वीकारलेला होता आणि त्याबद्दल त्यांच्यापैकी कोणाच्याही मनात कसलाही विकल्प येत नसे. इष्ट देवतावाद आणि यहुदी व ख्रिस्ती यांनी शिकविलेला अस्सल एकेश्वरीवाद यामध्ये महंमदाची ओढाताण झाली असावी. या विधानाला बळकटी आणणारा काही पुरावा मिळतो हे आपण पुढे पहाणारच आहोत.

त्यामुळे महंमदाने स्वतःच्या ईश्वराच्या सामर्थ्याबद्दल आग्रह धरला तरी त्या वरून मक्केत चलबिचल माजण्याचा संभव नव्हता. यहुदी आणि ख्रिश्चन यांचे ईश्वर ज्याप्रमाणे मानव समाजाचे मूल्यमापन करतात तसाच महंमदाचाही हेतु असावा असा त्याच्या विषयी समज करून घेतला गेला आणि ईश्वराच्या ठायी मेलेल्याचे पुनरूत्थान करण्याचे सामर्थ्य असते असे जे छन्यार्थाने सूचित केले जाते त्याला संशयवादात काही स्थान असले तर असेल



अनुक्रमणिका

त्यांच्याकडे त्याला महत्व देण्याचे कारण नाही असे समजले जाई. मक्केतील नागरिकांत त्यापेक्षा व्यवहार्य कल्पना पूर्वीपासूनच मोठ्या प्रमाणात प्रचलीत होत्या. श्रीमंतांची आत्मसंतुष्टता आणि आपल्या संपत्तीमुळे आपल्यावर कोणाचाही अधिकार चालू शकत नाही याबद्दलची त्यांची दृढ समजूत यासंबंधीची टीका सर्वांर्थाने रास्त समजली जात असे. दानधर्माच्या आवश्यकतेवर भर देण्यात येत असे त्यातही नेहमीपेक्षा निराळे असे काही नव्हते. दातृत्व हा टोळ्यांमध्यांच्या जुन्या आदर्शानुसार देखील सर्वोच्च गुण समजला जात असे आणि मक्केतील सधन लोक फार करुन तो व्यवहारात आणीत नसले तरी सर्वसाधारण माणसांच्या मनात तो रुजलेला असल्यामुळे नागरिकांचा त्याला पाठिंबा मिळू शकला. बळी दिला म्हणजे अनपेक्षितपणे देवताकडून वरदान मिळू शकते. आणि त्यामुळे देवतेचा संभाव्य कोप टाळता येतो. म्हणून बळी देणे महत्वाचे ठरते या त्याकाळातील विद्यमान धार्मिक श्रद्धांशीही त्याचा संदेश मिळता जुळता असा होता. यापैकी कशातही नैतिकतेच्या दृष्टीने महत्वाचे असे काहीही नवीन सांगितलेले गेलेले नाही हे स्पष्ट आहे. ज्या धर्मगुरुंनी अरबी राष्ट्रवादावर आधारलेल्या यहुदी-ख्रिस्ती कल्पना शिकविण्यात आलेल्या होत्या त्यांना अरबी राष्ट्रवादाचे आकर्षण वाटणे भागच होते.

यापैकी कशातच मक्केच्या नागरिकांना अस्वीकार्य असे काही दाखविण्यासारखे नव्हते. आणि महंमदाचे प्रमुख माणसांना आपल्या बाजूला वळवून घेण्याचे जे प्रयत्न चाललेले आपण पहातो त्यामागे देखील लोकांना न पटण्यासारखे त्यात काही नाही याबद्दल त्याची खात्री होती. क्रांतिकारी वाटावे असे त्यात काहीही नव्हते. महंमदाच्या कल्पनांचा खोलवर जाऊन विचार केला तर त्यामुळे दृष्टीकोनात मूलभूत परिवर्तन घडवून आणू शकणाऱ्या त्या होत्या हे खरे पण त्याकडे कोणाचे लक्ष गेलेले नव्हते आणि निदान त्यावेळी तरी त्यांचा संपूर्ण आविष्कार झालेला नव्हता. अरबांमध्ये त्यावेळी प्रचलित असलेल्या नैतिक आणि धार्मिक श्रद्धांचे जे स्वरुप होते त्यापैकी एक येवढेच त्यावेळी महंमदाच्या शिकवणुकीचे स्थान होते आणि तरीही जे आपले वय आणि सामाजिक प्रतिष्ठा यामुळे आपल्या आर्थिक गरजा भागवू शकेल असा संदेश ग्रहण करण्यास उत्सुक असत. त्यांच्यातील अनेक जणांना आकर्षित करून घेण्याचे सामर्थ्य महंमदाच्या शिकवणुकीत होते. त्याचे कारण काय होते ते आपण पाहिले आहे. महंमद ज्या कल्पना प्रसृत करु पहात होता त्या कल्पनात अगदी अद्भुत असे काही नसले तरी बाह्य शक्तीचे अस्तित्व ज्या अगदी

व्यक्तिगत मार्गाने त्याला प्रतीत झाले असे तो मानीत असे त्याचा त्या कल्पनांशी अगदी अभिनव असा समन्वय साधला जात असे हे त्यांचे वैशिष्ट्य होते. या प्रक्रियेत व्यक्तीला खास महत्त्व प्राप्त होत असे. त्या पर-मोच्च शक्तीकडून अशा व्यक्तींचीच दखल घेतली जात असे. तिनेच त्या व्यक्तीला निर्माण केले असून त्या व्यक्तीची जमात, घराणे किंवा कुळ अथवा नातीगोती या कशाचाही विचार न करता त्या व्यक्तीचे मूल्यमापन केले जाते. अशा रीतीने एक सामाजिक घटक म्हणून ज्या व्यक्तीचे महत्त्व आर्थिक प्रगती-मुळे वाढलेले असेल त्या व्यक्तीला तात्विक दृष्टीनेही महत्त्व प्राप्त होते आणि अनादी तत्वाशी ती नाते जोडू शकत असल्याने तिला स्वतःचे असेही महत्त्व प्राप्त होते. ज्यूडो-ख्रिश्चन धर्मांना उच्च संस्कृतीच्या आणि सामर्थ्यशाली साम्राज्यात मानाचे स्थान प्राप्त झालेले असल्यामुळे त्यांच्या संपर्कात येणाऱ्या सर्वांनाच त्या धर्मांचे आकर्षण वाटे. साहजिकच ज्यावेळी त्या शिकवणुकीची मांडणी अरबी भाषेतून करण्यात येऊ लागली. आणि त्या शिकवणुकीपैकी सहजासहजी आत्मसात करता येण्यासारखी मूलतत्वे एका अरबी दूताकडून प्रसृत केली जावू लागली त्यावेळी अरबांच्या अभिमानाला ती सर्वस्वी पोषक अशी ठरली.

नव्या धर्मोपदेशकाने सुरु केलेली तत्त्वविषयक चळवळ आणि त्याने आकर्षित करून घेतलेले लोक हे सबंध पश्चिम अरेबियांत वारंवार उदयास येणाऱ्या निरनिराळ्या विचारसरणी आणि धर्ममंडळे त्याचप्रमाणे विविध स्वरूपाच्या चळवळी यात समाविष्ट होवून जातील असे सुरवातीला वाटण्याची शक्यता आहे. तथापी त्यातून हिंसक संघर्षाची ठिणगी पडणार होती. त्याची कारणे काय होती ते आपल्याला आता समजून घ्यावयाचे आहे.

अगदी सुरवातीला जर कोणी महंमदाच्या संदेशाचा स्वीकार केला असेल तर तो त्याच्या स्वतःच्या कुटुंबियांनी. त्यात त्याची पत्नी खादीजा ही अर्थात होतीच. त्याचबरोबर त्याचा पोरसवदा पुतण्या आणि पाल्य अली हाही होता. सुरवातीच्या काळातील त्याचा आणखी एक अनुयायी म्हणजे गुलामगिरीतून मुक्त करण्यात आलेला झैदइब्न हारिथ हा होय. महमदाला ख्रिस्ती धर्मासंबंधीची माहिती करून देण्यात याचा बराच वाटा असावा. महंमदाच्या काल्ब नावाच्या जमातीत तो धर्म मोठ्या प्रमाणावर प्रचलित होता हे आपण वर पाहिलेच आहे. त्याच्या कुटुंबियांच्या जोडीला बाहेरचे दुसरे कोण कोण अनुयायी त्याला प्रथम मिळाले ? या विषयावर पुढे फार मोठी रणे माजली. कारण सुरवातीला ज्यांनी इस्लाम धर्माची दीक्षा घेतली. त्यांना मानसन्मान







आणि प्रतिष्ठा प्राप्त होवू लागली. मुस्लीम साम्राज्याच्या सुरवातीच्या काळात झालेल्या भीषण राजकीय संघर्षात त्यांना फार महत्व प्राप्त झाले. विशेषत: इस्लाम धर्माची दीक्षा घेणाऱ्यांच्या वंशजांकडे अशा मानसन्मानाचा आणि प्रतिष्ठेचा वारसा जाऊ लागल्याने तर ते आणखीच महत्वाचे वाटू लागले महंमदाच्या सुरवातीच्या अनुयायांनी नेमक्या कोणत्या तारखेला ईस्लामधर्म स्वीकारला याला इतिहासकारांच्या दृष्टीने फारसे महत्व नसले तरी या बाबतीतील अग्रक्रमासंबंधी विशेष जागरूक असणाऱ्या त्या काळातील राजकारणी लोकांना त्याचे विशेष महत्व वाटत असे. हे लक्षात घेऊन दीक्षा विधीच्या प्रत्यक्ष तारखांकडे विशेष लक्ष न देता सुरवातीच्या काही वर्षात ज्यांनी त्या धर्माची दीक्षा घेतली अशा पहिल्या सुमारे चाळीस अनुयायांची नावे ठोकळ मानाने सांगता येतील.

अबू बकर नावाचा एक व्यापारी अशा अगदी सुरवातीला धर्मांतरितांपैकी एक होता. त्याला अबू बकर हे नाव त्याच्या कुन्यावरून पडले होते. शादीजानंतर लगेच त्यानेच प्रथम दीक्षा घेतली असे सांगितले जात असले तरी वस्तुस्थिती तशी नव्हती. महंमदापेक्षा सुमारे तीन वर्षांनी तो लहान होता आणि काही अंशी तो चांगल्या सुस्थितीत असावा असे दिसते. तो धाडशी, दृढ निश्चयी होता त्याचप्रमाणे तो व्यवहारचतुर आणि योग्य निर्णय घेणारा होता. एकदा इस्लाम धर्माची निवड केल्यानंतर त्याने आपले पाऊल कधीही मागे घेतले नाही. महंमदाशी तो संपूर्णपणे एकनिष्ठ राहिला त्याचबरोबर तो महंमदाला त्याचे निर्णय सौम्य करावयास लावीत असे. मार्गोलिओथ लिहितो की, अबू बकर हा " असलाच तर विभूतिपूजक होता. सर्वसाधारणपणे स्त्रियांत असलेला परंतु काही वेळी पुरुषांतही आढळणारा असा एक गुण त्याच्यात होता तो म्हणजे कसलीही शंका न घेता किंवा मागेपुढे न पाहता समर्पणाच्या भावनेनं दुसऱ्या कोणाच्या तरी मागे जाण्याची तयारी; एकाद्यावर खूप विश्वास असणे हेच अशा लोकांच्या दृष्टीने आणखी विश्वास ठेवण्याचे कारण असते.

प्रेपिताच्या मृत्यूनंतर सुमारे चाळीस वर्षांनी मक्केत जन्माला आलेल्या एका माणसाने इस्लामी धर्माच्या सुरवातीच्या काळासंबंधीचे संशोधन करण्यात सारी हयात घालविली होती शेवटपर्यंत जाऊन पोहोचणारी एक आख्यायिका सांगताना तो म्हणतो :

" देवदूत इस्लामी धर्माचे आवाहन उघडपणे त्याचप्रमाणे गुप्तपणे ही करीत असे. तरुण आणि दुबंळ यांच्यातील ज्यांच्यावर ईश्वराचा अनुग्रह असे



अनुक्रमणिका

ते मोठ्या उत्सुकतेने महंमदाचा उपदेश ऐकून घेत असत. त्यामुळे त्याच्यावर विश्वास ठेवणारांची संख्या फार मोठी होती. तो जे सांगत असे त्याला नास्तिक कुरेशाइट त्याला नावे ठेवीत नसत. तो ज्यावेळी त्याच्या घोळक्यावरून जात असे त्यावेळी ' बानू अब्द अलमुत्तालिब जमातीतील तो तरुण म्हणे स्वर्गा-संबंधी बोलत असतो. 'असे ते त्याच्याकडे बोट दाखवून आपापसात बोलत असत: '

वरील अवतरणात बुहूलने केलेल्या दुरुस्तीनुसार बहुधा ते उद्‌गार खालील-प्रमाणे असावेत.

' स्वर्गीतील कोणी तरी त्याच्याशी बोलतो.

हे तरूण आणि ' दुर्बल ' म्हणजे कोण ?

मॉंटगॉमेरी वॅट याने पहिल्या चाळीस श्रद्धाळू अनुयायांच्या जीवना-संबंधीचा अत्यंत तपशीलवार अभ्यास केला असून तो फार मोलाचा आहे. त्याने काढलेल्या निष्कर्षांचा सारांश असा.

त्यांच्यात मक्केतील अत्यंत वजनदार जमातीतील तितक्याच तोला-मोलाच्या घराण्यातील तरुण माणसे होती. आणि ज्यांच्या हाती सत्ता होती त्यांच्याशी त्यांचे नातेसंबंध होते. त्यापैकी एकजण खालिद इब्न सईद इब्न अल-आस हा होता. त्यावेळच्या दोन सत्ताधारी जमातीपैकी तो अब्द शम्स या जमातीतील उम्मया घराण्याचा होता. या घराण्याला पुढे फार महत्व प्राप्त होणार होते. त्याला असे स्वप्न पडले होते की, तो एका आगीच्या तलावाच्या काठाशी उभा आहे आणि त्याचे वडील त्याला त्या तलावात ढकलीत आहेत. एका माणसाने त्याला मागे खेचल्यामुळे तो वाचला. ज्या माणसाने त्याला या संकटातून वाचवले तो स्वप्नातील माणूस महंमद असावा अशी अबू बकरची पक्की खात्री होवून चुकली होती. तेव्हापासून तो महंमदाचा अनुयायी बनला आणि त्यानंतर थोड्याच दिवसांनी त्याचा भाऊ अमर त्याला येऊन मिळाला. त्याचे वडील निवर्तल्यानंतर अबान नावाच्या त्याच्या तिसऱ्या भावाने काही कविता रचल्या असून त्यात ती मृत व्यक्ति आपल्या मुलांनी केलेल्या चुकांबद्दल शोक करीत असलेली दिसते. त्याला खालिदने कवितेतच पुढील प्रमाणे उत्तर दिले आहे.

मेलेल्याची आता फिकीर नको; त्याच्या
नशिबात होते ते घडून आले.
तुमच्या शेजाऱ्याची दखल घ्या.
त्याची गरज जास्त आहे.

अशा तऱ्हेचे एका तरुणाने केलेले एक बंड म्हणून या घटनेकडे पहाण्याचा मोह झाल्याशिवाय रहात नाही. ' घराणी ! मी त्यांचा तिरस्कार करतो ! ' असे म्हणण्यामागे बंडाची जी भावना आहे तीच या कवितेत प्रकट होते. नवीन पार्श्वभूमी असलेला त्याच घराण्यातील इथमान इब्न अफ्फान नावाचा महंमदाचा आणखी एक अनुयायी होता. तो सुमारे तीस वर्षांचा होता आणि त्याच्या नशिबी फार मोठे चढउतार लिहिलेले होते. परंतु त्या काळापुरते बोलायचे तर तो केवळ एक देखणा आणि नखरेबाज तरुण होता. इतर कशापेक्षाही कपडेलत्ते आणि नट्टापट्टा यातच तो मशगूल असे. तो आळशी होता तसाच फारसा धीट ही नव्हता. परंतु व्यापारात मात्र त्याचे हे बरे चांगले चालत असे. जास्त करून रुकाया या महंमदाच्या मुलीवरील प्रेमामुळेच त्याने इस्लाम धर्माची दीक्षा घेतली असे सूचित केले जाते. महंमदाच्या अनुयायांचा जो दुसरा वर्ग आहे त्यात फार बड्या किंवा प्रभावी नसलेल्या घराण्यातील लोक मोडतात. त्यापैकी बहुतेकजण विशीच्या आतील तरुण होते. पण त्यातही ३५ ते ५० वय असलेल्या एक दोन व्यक्ती होत्या. यापैकी काहीजण आपापल्या जमातीत किंवा घराण्यात थोडेफार वजन असलेल्या अशा लोक्या. उदाहरणार्थ यापूर्वीच ज्याचा उल्लेख केला आहे तो अबूबकर याच वर्गातला होता, त्यावेळी त्याने चाळीशी गाठली होती. तसाच तल्हा इब्न उबैदल्ला. तो उत्साही, शूर आणि महत्वाकांक्षी तरुण होता. त्याने दीक्षा घेतली त्यावेळी त्याचे वय अठरापेक्षा जास्त नसावे.

x x × × ×

फ्रेडरिक नित्शेवरून

## प्रामाणिक पुस्तकाचे मोल

प्रामाणिक पुस्तके ही पुस्तके वाचणारालासुद्धा प्रामाणिक बनवितात. अशा पुस्तकांच्या वाचनाने जास्त काही साधले नाही तरी एक गोष्ट साधते. ती म्हणजे एरवी [illegible] माणसाच्या बुरख्याखाली जो राग आणि तिटकारा आपण झाकून टाकावयास ठेवलेला असतो तो बाहेर काढावयास ही पुस्तके उपयोगी पडतात. प्रत्यक्ष माणसांशी वागताना जरी आम्ही संयमाने वागत असलो तरी पुस्तकावर तुटून पडताना आम्हाला कोणीच अडविणार नसते.



अनुक्रमणिका



फ्रॉइड यांचे स्वप्नासंबंधीचे हे मूलभूत प्रमेय. या प्रमेयामुळे मनुष्याची तोवरची व्याख्या आमुलाग्र बदलत होती. मनुष्य झोपेत जे करतो उदा. स्वप्ने पाहतो ते त्याचे स्वप्नातले व्यापार निरर्थक नाहीत. त्याच्या जागेपणीच्या व्यवहाराइतकेच ते सुद्धा अर्थपूर्ण आहेत. हे प्रमेय जर मान्य केले तर त्याचा अर्थ असा होतो की, जागेपणीचा व झोपेतला अशा दोन्ही अवस्थेतल्या मनुष्याच्या मानसिक, शारिरीक व्यवहारात एक प्रकारची अखंडता आहे. ही एक अखंड, व चालू क्रिया आहे. मनुष्य ही एक अखंड, अविचलितपणे घडत जाणारी ऐतिहासिक प्रक्रिया असून तिच्या त्या ऐतिहासिक घडण्याला स्वत:चे विशिष्ट प्रयोजन आहे. जागेपण आणि झोप या दोन्ही अवस्थात एक कायम देवाणघेवाण आहे, आणि एकाच नाण्याच्या त्या दोन बाजू आहेत. जुने मानसशास्त्र, जागेपणीचे व्यवहार आणि झोपेतले व्यवहार या दोन व्यवहारात खंड किंवा खळ मानतात. तसेच या दोन व्यवहारात सलग कार्यकारणभाव नाही असे समजतात. फ्रॉइड हे दोन्ही व्यवहार सलग मानतात. तसेच त्यात कार्यकारणभाव आहे असेही मानतात.

प्रत्येक व्यक्ती ही एकएक स्वतंत्र इतिहास असतो. जे जे सगळे तिच्या बाबतीत घडते ते ते ती स्वत:मध्ये वागविते आणि कोठल्याही क्षणी ते तिच्या ठिकाणी पहावयास सापडते अशी भूमिका घेतल्यावर मानसतज्ज्ञ हा इतिहासकार–मनाच्या इतिहासाचा इतिहासकार बनतो. किंवा अधिक बरोबर म्हणजे पुरातत्ववेत्ता बनतो. पुरातत्ववेत्ता ज्या प्रमाणे जमिनीत गाडले गेलेले ऐतिहासिक पुरावे खोदून व शोधून त्यांच्या साहाय्याने एखाद्या देशाचा इतिहास लिहितो त्याप्रमाणेच मानसतज्ज्ञ विस्मरणात गाडले गेलेले व्यक्तीच्या इतिहासाचे पुरावे हुडकून काढून तिच्या आयुष्याचा पट रचून दाखवितो. किंवा असेही म्हणता येईल की, मानसतज्ज्ञ म्हणजे गूढ चित्र वा सांकेतिक लिपीचा अन्वयार्थ लावणारा मनुष्य होय.

फ्रॉइडचा स्वप्नाचा सिद्धांत हा स्वप्नाचा ऐतिहासिक स्वरूपाचा सिद्धांत आहे.

स्वप्नाची मीमांसा करताना फ्रॉइड स्वप्नगुंफणाचे Dream work चे दोन भाग करतात. एक भाग ते जाहीर स्वरूपाचा मानतात. तर दुसरा खाजगी गुप्त व प्रच्छन्न स्वरूपाचा मानतात. फ्रॉइड यांच्या मते मनाच्या किंवा प्रत्येक व्यक्तित्वाच्या आत परस्परविरुद्ध प्रेरणांचा खेळ चालू असतो आणि या खेळाचा प्रगट परिणाम म्हणजे त्या व्यक्तीला पडणारी स्वप्ने होत. स्वप्नाला अशा प्रकारे एक आतले व दुसरे बाहेरचे अशी दोन अंग असतात आणि या

दोन अंगातील फक्त बाहेरचे-प्रत्यक्ष स्वप्न दृश्याचे अंग तेवढे आपण पहातो. परंतु आत जो संघर्ष चालू असतो आणि ज्याचे प्रत[illegible]ब स्वप्नदृश्याच्या रुपाने बाहेर आलेले असते ते आपण पाहू शकत नाही [illegible]प्नातील दृश्यं ही प्रतिके असतात. त्यांच्या रूपात जो अर्थ दिसतो तो [illegible] खरोखरीचा अर्थ नव्हे. थोडक्यात स्वप्नगुंफणाच्या जाहीर अथवा प्रग[illegible]कांतून त्याच्या आतला प्रच्छन्न व खाजगी भाग ताडता येतो. मात्र [illegible] आणि खाजगी असे दोन भाग असले तरी खाजगी भा[illegible] जाहीर भागाचे नियमन करतो असे नव्हे. जाहीर भागाचे नियमन आणखी [illegible] घडते किंवा स्वप्नाचे विशिष्ट जाहीर स्वरूप हे त्याच [illegible] घटकांनी ठरविले जात नाही. ते स्वरूप प्रेरणांच्या परस्पर [illegible] त्यामुळे त्यातून निर्माण होणाऱ्या ताणातून ठरविले जाते. प्रेरणा [illegible] आंतरिक ताणातून स्वप्न घडवितात. किंवा त्या ताणांमु[illegible]स्वप्न गुंफ[illegible] जाते असेही आपण म्हणू शकतो. म्हणजे या प्रेरणा व त्या प्रेरणांचा एकमेकावरचा भार हे स्वप्नगुंफणाचे कारण होय. स्वप्नात जे दृश्य आपण पाहतो त्या दृश्याच्या मागे स्वप्नाचा आणखी काही प्रच्छन्न भाग असतो. परंतु त्या भागामुळे स्वप्नातली दृश्ये ठरत नाहीत ती प्रेरणांच्या अंतर्गत क्रियाप्रक्रियांमुळे ठरतात. असे फ्रॉइड सांगतात.

स्वप्न गुंफणाला प्रेरणा व त्या प्रेरणांवर [illegible]रा दाब कारण असल्याने स्वप्नाचा अर्थ लावताना ज्या प्रेरणांमुळे व त्यांच्या [illegible]बामुळे स्वप्न पडते त्या प्रेरणांचा व त्यांच्यावरच्या दाबाचा शोध घेणे अ[illegible] याचा अर्थ. कारण या प्रेरणांच्या दाबामुळे प्रत्यक्ष स्वप्नाच्या पाठीमागचे [illegible]जगी स्वप्नघटक उत्पन्न होतात. तसेच या प्रेरणांच्या दाबामुळेच हे घटक ए[illegible]त्र बांधून ठेवले जातात आणि त्यातून पुढे आपण पाहतो ते स्वप्नदृश्य आकारास येते.

स्वप्नाचे विश्लेषण करताना अशा प्रकारे प्रथम स्वप्नदृश्यात ज्या प्रतिमा व प्रसंग आपण पाहतो त्यांचा विचार येतो. मागाहून त्या प्रतिमा व प्रसंग ज्या दुसऱ्या प्रतिमा व प्रसंगांसाठी पर्याय म्हणून आ[illegible]लेले असतात त्यांचा विचार येतो. फ्रॉइड यांच्या मते प्रत्येक स्वप्नाचा काही भाग उघड व जाहीर स्वरूपाचा असतो. तर दुसरा काही भाग गुप्त आणि खाजगीपेक्षाही खाजगी स्वरूपाचा असतो. आपले मनच स्वप्नाची जाहीर आणि खाजगी अशी दुहेरी विभागणी करते. कारण स्वप्नाच्या मागे व आत [illegible]या काही भाग असतो की, जर का तो सार्वजनिक झाला तर स्वप्न प[illegible]रा दाखवण्याची शक्यता असते. म्हणून मन असा निषिद्ध, [illegible]म बाद लावणारा भाग मागे लपवून ठेवून

फक्त सोज्वळ भाग तेवढा बाहेर दाखविते. हा सोज्वळ भाग कोणीही पाहिला तरी त्यात लाज बाळगण्याचे कारण पडत नसल्याने स्वप्न पाहणारा निर्धास्तपणे तो स्वप्नाच्या रूपाने पाहू शकतो. परंतु या सोज्वळ भागाच्या मागे किंवा आत जो दुसरा अत्यंत खाजगी म्हणुन लपवून ठेवलेला भाग असतो. तो उघड झाल्यास इतराना नव्हे तर प्रत्यक्ष स्वप्न पाहणाराला व ज्याच्या मनाचा तो भाग असतो त्यालाही लाज वाटण्याची शक्यता असते. याचा अर्थ स्वप्नाचा जाहीर भाग जेवढा निरागस असतो तेवढा हा भाग निरागस नसतो. उलट त्यात अनेक प्रकारचा निषिद्ध मालमसाला असतो. कारण त्याचा संबंध कामवाचक इंस्टिक्ट व त्या इंस्टिक्ट्स्च्या भुकांशी असतो. वर इंस्टिक्टचा विचार करताना आपण हे पाहिलेच की, आत्मरक्षणात्मक इंस्टिक्टच्या गरजा या नैसर्गिक व नेमक्या गरजा असल्याने कोठल्याही परिस्थितीत त्या भागविल्या जाव्याच लागतात. परंतु कामवाचक इंस्टिक्टच्या वासना व इच्छा अनेक प्रकारच्या असतात आणि सुख ही त्यांची प्रधान प्रेरणा असते. तसेच त्यातून अनेक वासना अशा असतात की, बालपणी जरी त्यांच्याबद्दल काही विशेष वाटले नाही तरी मोठेपणी त्यांची आठवणसुद्धा शरम आणणारी असते.

इंस्टिक्टस [illegible] काम आपण वर पाहिलेच आहे. मानवी आयुष्याच्या सुरवातीला एकच इंस्टिक्ट काम करीत असते. ते म्हणजे भरणपोषण मलमूत्र विसर्जन वगैरे गरजांशी निगडीत असणारे आत्मरक्षणात्मक इंस्टिक्ट. या इंस्टिक्टच्या गरजा व त्याशी संबंधित इच्छा सफल झाल्या म्हणजे त्या पिंडाला इच्छापूर्तीचा व गरज भागल्याचा आनंद होतो. परंतु हा आनंद होत असताना हळूहळू त्या पिंडामध्ये आणखीसुध्दा काही आधिक घडत असते. उदा. ज्या विशिष्ट शारिरिक ठिकाणांकडून त्याच्या गरजा व इच्छा भागतात ती ठिकाणे त्या गरजा भागताना उद्दिपित होऊन उद्दिपन आणि उद्दिपनाचे शमन झाल्यामुळे होणारा आनंद अशा एका नव्याच आनंदाची व तो आनंद मिळविण्याच्या मार्गाची स[illegible] पिंडाच्या मनाला लागते. कालांतराने पोट भरल्याने वा दैहिक गरजा [illegible]ल्याने होणारे समाधान आणि शरिरोद्दिपन आणि उद्दिपनाचे शमन यातून हो[illegible] आनंद ही दोन एकमेकापासून अलग होतात. त्यांना स्वायतता प्राप्त होते. तो स्वतःच्या हक्काने जगू लागतात. म्हणजेच त्या पिंडामध्ये दोन वेगवेगळया इंस्टिक्टस तयार होऊन कार्य करू लागतात.

मूल वाढताना या दोन वेगवेगळया प्रेरणा तयार होऊन राहतात. एक प्रेरणा पूर्णपणे शारिरीक गरजांशीच निगडीत होऊन वावरते. तर दुसरी

बाह्य परिस्थितीशी निगडीत होऊन वावरते. समजा आईच्या अंगावर पिणारे मूल आहे. या मुलाला कधी आई खेळविल तर कधी दाई वा इतर कुणी खेळविल. पुढे त्याच मुलाला बाटलीतून दूध देणे सुरू होईल. हे दूध कधी त्याची आई त्याला देईल तर कधी दाई वा इतर कुणी ते त्याला देईल. येथे आईच्या हाताचा स्पर्श त्याला अधिक सुखकारक वाटणे शक्य आहे. कारण त्यात मायेचा ओलावा अधिक असू शकेल. हा स्पर्श जी सुखसंवेदना त्याच्या मनात जागी करून ठेविल ती सतत त्याला हवीशी वाटत राहील. कारण शारिरीक गरजा भागल्याने होणारे सुख हे सवयीने पुढे शिळे वाटू लागेल. त्या मानाने हे दुसरे सुख सतत ताजे राहाणे शक्य आहे. कारण त्यात अपेक्षित कल्पनेचा भाग जास्त असतो. अशा या दोन प्रकारच्या सुखाच्या कल्पना आणि इच्छा प्रत्येक मानवी मनात तयार होऊन राहतात. यातील एक शरिराच्या गरजांशी संबंधित आहे. तर दुसरी अवांतर परिस्थितीशी संबंधित आहे. बालपणातील इंस्टिक्ट सुलभ, सुखे असा ज्या सुखांचा उल्लेख फ्रॉइड करतात ती सुखे म्हणजे ही सुखे होत. या सुखांचा संबंध कामवाचक ( उपप्रेरणा व त्यातून शेवटी तयार होणाऱ्या ) प्रेरणेशी असल्याने त्यात निषिद्ध इच्छा व वासनांचा बराच मोठा अंश असू शकतो. सुखाचा सगळा नमुनाच बालपणातल्या या अनुभवांवर बेतला जात असल्याने मोठेपणीची सुखे सुद्धा कोठे ना कोठे याच नमुन्यात वावरत असतात. जेथे जेथे असा संबंध उघड ध्यानात येण्यासारखा वाटतो तेथे तेथे प्रौढ मन ती वासना दाबून दडपून टाकू पहाते. कारण तसे केल्यावाचून त्या मनाला गत्यंतरच असत नाही. तसे न केल्यास मनाला अपराधीपणा वाटण्याची शक्यता असते. परंतु ही सुखे म्हणजे एक प्रकारची चटक असल्याने आणि मनातल्या मनात निर्माण होणारा ताण कमी करण्याचाही तो मार्ग असल्याने जागृत मनाच्या नकळत मन परत परत त्या सुखांकडे वा त्याच्या आठवणींकडे वळत राहाते. यातून मनात संघर्ष तयार होतो. मनुष्याचा अहम् किंवा मी ( इगो ) अशा कल्पना चालवून घेण्याच्या विरूद्ध असतो. कारण वय वाढत असताना अनेक सामाजिक नैतिक आदर्श त्या ' मी ' ने आजूबाजूच्या जगातून उचललेले असतात. हे नैतिक आदर्श त्याला अशा प्रकारच्या निषिद्ध वासना व कल्पना धारण करू देत नाहीत. निषिद्ध वासना आणि आदर्श नैतिक धारणा यांच्यात जो झगडा सुरू होतो त्या झगड्यातून मार्ग काढण्यासाठी मन मग एक तिसराच पर्याय काढते. ते या निषिद्ध वासना-कल्पनांचे खरे रूप बदलून त्यांना नैतिकदृष्ट्या सोज्वळ व निरुपद्रवी असे दुसरे रूप देते. आता या वासना कल्पना निर्धास्तपणे व्यक्त होऊ शकतात. स्वप्न म्हणजे

निर्धास्तपणे व्यक्त झालेल्या या इंस्टिंक्ट सुलभ वासना–कल्पना होत. हे दडपून टाकलेले भाग स्वप्नात व्यक्त झाल्याने दोन गोष्टी साधतात. एकतर त्या वासनांना त्यांच्या इच्छेप्रमाणे बाहेर पडता येते. म्हणजे त्यांच्यावरचा दाब दूर केला जाऊन त्यांना मनपसंत वागता आल्याचे समाधान घेता येते. उलट त्यांचे निषिद्ध रुपही 'मी' पासून दडवून ठेवणे गेल्याने 'मी' लासुद्धा काही वाईट गोष्ट होऊन दिल्याचा मानसिक त्रास घडत नाही. एका दगडात अशा प्रकारे येथे दोन पक्षी मारले जातात.

स्वप्नाच्या बाहेरून म्हणजे स्वप्नात ज्या गोष्टी दिसलेल्या असतात त्यांच्याच बाजूने पाहिल्यास ही दृश्ये अगदीच निरुपद्रवी आणि सोज्वळ असू शकतात. ( उदा. कामविकार अत्यंत तीव्र असल्याने एका इसमाला स्वप्नात तो घोड्यावर स्वार झाला असून तो घोडा चौखूर उधळत आहे असे दृश्य दिसले. प्रत्यक्षात आपला काम अति तीव्र आहे हे त्याने मान्य केले नसते. स्वप्नातल्या दृश्यात वस्तुतः तोच संदेश आहे. पण तो संदेश प्रच्छन्न भाषेतला असल्याने म्हटला तर आहे, म्हटला तर नाही अशा स्वरूपाचा आहे. आपल्या प्रबळ कामविकाराबद्दलचे हे विवेदन तो इसम कदाचित बुद्धीने नाकारील. पण त्याच्या भावनांनी ते त्याच वेळी कबूलही केलेले असेल.) हा निरुपद्रवी आणि सोज्वळ भाग म्हणजे स्वप्नाचा जाहीर भाग होय. याच्या आत असणारा आणि इंस्टिंक्टचा खरा संदेश स्वतःमध्ये वागविणारा तो प्रच्छन्न, गुप्त खाजगी भाग. आणि याच्याही पाठीमागे ज्याच्यामुळे मुळात हा ताण तयार झाला व त्याच्यावर स्वप्नाचे उत्तर शोधून काढावे लागले तो इंस्टिंक्ट्सचा भाग होय. म्हणजे स्वप्नाकडे स्वप्नाच्या बाजूने पाहिल्यास प्रथम स्वप्नाचा जाहीर भाग, नंतर इंस्टिंक्टला हव्याशा वाटणाऱ्या सुखाच्या इच्छेचा भाग व सर्वात शेवटी त्या इच्छेला कारणीभूत होणारे इंस्टिंक्ट असे हे गणित आहे. तर दुसरीकडून प्रथम इंस्टिंक्ट, नंतर त्या इंस्टिंक्टची सुखाची कल्पना वा इच्छा व शेवटी त्या कल्पनेची परिपूर्ती करणाऱ्या प्रसंगाचे स्वप्नमय दृश्य असे गणित असते. सुख ही कल्पना म्हणून जरी आपण एक आणि अविभाज्य मानीत असलो तरी सुखाच्या अनेक परि आहेत. त्यामुळे कामवाचक इंस्टिंक्टने प्रेरणा दिलेल्या इच्छा अनेक प्रकारच्या असू शकतात आणि या इच्छांचे वैविध्य विचारात घेता स्वप्नातल्या सामग्रीचे वैविध्य सहज उलगडावे. कामवाचक इंस्टिंक्ट घडत असताना ते सुखाच्या अनेक मुशीतून गेलेले असते. जितक्या मुशी तितक्या सुखाच्या चवी व कल्पना. या सगळ्या चवी मानवी मनात साठून असतात. कारण मानवी मन कधीच काही विसरत नाही. जशी चव आणि अपेक्षा तशी स्वप्नातली स्वप्नातील कलाकुसर सजविली जाते.





फ्राइड अशा प्रकारे Dream Phenomenon किंवा दृश्य स्वप्न वा स्वप्न गुंफणापासून प्रारंभ करून मागे जात जात स्वप्नाला प्रेरक ठरणा-या मूळ इंस्टिंक्ट प्रत पोहोचतात. फ्राइड यांच्या मूळ सिद्धांताप्रमाणे मूळ इंस्टिंक्ट एक आणि एक ते म्हणजे शरिररक्षणाचे व शरीररक्षणाच्या इच्छेचे. पुढे हे इंस्टिंक्ट विभागून त्यातून सुखाच्या प्रेरणेचे दुसरे नवे इंस्टिंक्ट तयार होते. स्वप्नगुंफण किंवा दिवास्वप्नरंजन या पहिल्या इंस्टिंक्टला धरून घडेल किंवा दुसऱ्या इंस्टिंक्टला धरुन घडेल. पहिले इंस्टिंक्ट किंवा त्या इंस्टिंक्टच्या मागण्या कोठल्याही परिस्थितीत पुरविल्या जाव्याच लागत असल्याने त्यांच्या इच्छा फारशा तीव्र नसतात. तसेच या इच्छांच्या बाबतीत शरम वाळगावी असेही काही नसल्याने त्या स्वतःशी सहजपणे कबूल केल्या जाऊ शकतात. ( भुकेल्या अवस्थेत एखादा झोपी गेल्यास त्याला मेजवानी झोडल्याचे स्वप्न पडू शकते कारण भूक ही आरण नैसर्गिक गरज मानू शकतो. ) परंतु दुसऱ्या कामवाचक इंस्टिंक्टच्या इच्छांच्या बाबतीत तसे म्हणता येत नाही. आपल्या समाजाच्या विशिष्ट प्रकारच्या नैतिक शिकवणुकीमुळे अनेक प्रकारचे वागणे निषिद्धपणात मोडते. म्हणून त्या वागण्याशी संबंधित मागण्या व इच्छा स्वतःशीदेखील नाकाराव्या लागतात. पण नाकारल्या म्हणून त्या नष्ट होत नसल्याने त्यांचा गुप्त जोर वाढतच राहातो. कारण मन सतत त्यांच्याच भोवती रुंजी घालित राहाते. व म्हणून आडवळणाने त्याना बाहेर येऊ देऊन त्यांचा जोर कमी करावा लागतो. ( उदा. एखाद्याच्या आईने ज्या प्रकारे बालपणी त्याला कुरवाळले असेल आणि त्यातून जी काही सुखसंवेदना व त्या सुखसंवेदनेच्या आठवणी त्याच्या मनात साचल्या असतील आणि ज्यापुढे वैषयिक आठवणीत रूपांतरित झाल्या असतील या त्याला स्वतःशी वा इतरांशी उघडपणे कधीच कबूल करता येणार नाहीत. साहजिकच त्या जरी इच्छेच्या रूपात मनात वावरत राहिल्या आणि स्वप्न हे आपल्या अपुऱ्या इच्छा काल्पनिक पातळीवर पुऱ्या करून घेण्याचे एक साधन असले तरी मूळ जशाच्या तशा स्वरूपात त्या केव्हाच स्वप्नात येऊ शकणार नाहीत. म्हणून त्यांचे मूळ रुप बदलून आणि सोज्वळ पेहेराव करुन त्या स्वप्नात येतात. ) मात्र स्वप्नात परावर्तित होण्यासाठी जी काही ऊर्जा त्याना लागते ती ऊर्जा इगो-इंस्टिंक्टपासून फुटून स्वतंत्र बनलेल्या सेक्सच्युअल इंस्टिंक्ट मधून त्या मिळवितात. फ्राइडच्या मते कामवाचक इंस्टिंक्टच्या ठिकाणी असणाऱ्या शक्ती किंवा Forces or Dynamisms स्वप्नाना चालना देतात, आणि विश्लेषक या शक्तींच्या उगमापर्यंत पोहोचला की, त्याचे काम होते.







स्वप्नगुंफणाचा जाहीर भाग म्हणजे स्वप्नात ज्या प्रतिमापंक्ती असतात त्याच तेवढ्या विचारात घेतल्या तर असे म्हणता येईल या प्रतिमापंक्ती खूप वेगवेगळ्या प्रकारच्या असल्याने त्यांच्या मागे राहून त्यांना चालना देणाऱ्या प्रच्छन्न बाबीसुद्धा तितक्याच वेगवेगळ्या प्रकारच्या असल्या पाहिजेत. साधे तर्कशास्त्र. प्रगट प्रतिमा विविध म्हणून त्यांच्या मागच्या चालना देखील विविध. कारण तसे नसते तर हरएक स्वप्नात एकाच वा छापिल प्रकारच्याच प्रतिमापंक्ती आल्या असत्या. परंतु तसे घडत नाही. कारण प्रगट स्वप्नगुंफणाला चालना देऊन दिशा दाखविणाऱ्या अप्रगट बाबी तितक्याच विविध असतात. फ्रॉइड हे नाकारीत नाहीत. परंतु त्यांचे म्हणणे असे आहे की, शेवटी अप्रगट घटकांचा प्रभाव चालून त्यांचे रूपांतर प्रगट चित्रप्रतिमात होणार की, नाही ही गोष्ट अप्रगट घटकांना जागे करणारी प्रेरक शक्ती स्पर्श त्यांना करील की, नाही यावर ठरते. ही प्रेरक शक्ती अप्रगट घटकात नसते. या कार्यशक्तीला [ Motor Force ] स्वप्नगुंफणात फार महत्व आहे. कारण या कार्यशक्तीमुळेच शेवटी स्वप्नगुंफण घडते. ही कार्यशक्ती मन स्वप्नाला उद्युक्त करते. आणि स्वप्नात ज्या कल्पना व्यक्त होतात त्या कल्पना एकत्र बांधून ठेवते. ही कार्यशक्ती infantile instinclual wishes मध्ये साठून असते. आणि अशी एखादी बालसुलभ इच्छा उद्दिपित झाली की, ती स्वप्नाची गुंफण घडविते. असे फ्रॉइड यांचे स्पष्ट मत आहे. All dreams are wish-fulfilments असे फ्रॉइड म्हणतात. आपल्या मनाच्या आत सुप्ताच्या अनेक इच्छा असतात. या इच्छा उद्दिपित झाल्या की, त्यातील आशयाप्रमाणे किंवा त्यात ज्या कल्पना असतील त्या कल्पनांना धरून त्या इच्छा पूर्ण झाल्याचे स्वप्न आपणाला पडते.

स्वप्नमीमांसेत खरा महत्वाचा भाग म्हणजे स्वप्नगुंफणाचा [ Dream work] चा. या गुंफणासाठी जे साहित्य लागते त्या साहित्याचा पुरवठा स्वप्नाच्या पाठीमागे स्वप्नाला मार्गदर्शन करणारा जो स्वप्नविचार किंवा स्वप्नकल्पना, त्या विचार वा कल्पनेकडून होतो. या साहित्यावर संस्कार केले जाऊन पुढे मग स्वप्न तयार होते. परंतु हे घडण्यासाठी मोटिव्ह पॉवर (कार्यशक्ती) वा ऊर्जा लागते. ही कार्यशक्ती बालसुलभ कामवाचक इच्छेच्या पोटातून येते. आपल्या मनाला अनेक थर आहेत. मनाच्या या थरांच्या भाषेत बोलावयाचे तर असे म्हणता येईल की, प्रत्यक्ष स्वप्नदृश्याचा थर हा सर्वात वरचा थर, त्याच्या पोटात स्वप्नविचार किंवा स्वप्नकल्पनेचा थर आणि त्याच्याखाली बालसुलभ कामवाचक इच्छा आणि वासनेचा थर. ही स्वप्न







इच्छा किंवा वासना जेथे असते तो मनाचा भाग अबोध असतो. ही वासना म्हणजे ऊर्जा असते. आणि ती सारखी खदखदत असते. ही ऊर्जा सुप्त, प्रच्छन्न स्वप्न विचाराला उद्दिपित करते. आणि स्वप्नविचार उद्दिपित झाल्यावर त्यातून स्वप्न चे प्रगट दृश्य तयार होते. परंतु स्वप्नातला विचार जसाच्या तसा मात्र त्या दृश्यात साकार होत नाही. त्यात अनेक बदल घडतात परंतु बदल घडून का होईना, एक आडवळण घेऊन मूळ वासना उघडपणे वर येऊन स्वत:चे समाधान करून घेते.

येथे एक नवा मुद्दा उपस्थित होतो. या स्वप्नमीमांसकाच्या दृष्टीने महत्त्वाची गोष्ट म्हणजे स्वप्नगुंफण. या स्वप्नगुंफणाचे साहित्य कसे मिळवले जाते, जोडले जाते व स्वप्नात पाहिला जातो तो पट विणला जातो? हे साहित्य कोठून मिळते? हे स्वप्नाचे साहित्य मनाला स्वप्नाच्या सुप्त किंवा प्रच्छन्न खाजगी भागाकडून [ latent dream Thought] कडून मिळते. ह्या सुप्त कल्पना एकत्र गुंफून व त्याना सोज्वळ रुपात बसवून स्वप्न तयार होते. परंतु ह्या कल्पना एकत्र कशा येतात? Infatile Dream Wish मुळे. बालपणात अनेक प्रकारच्या सुख संवेदना मनुष्याने उपभोगलेल्या असतात. या सुखसंवेदना उपभोगताना कसल्याही प्रकारचा विधिनिषेध बाळगण्यात आलेला नसतो. कारण ज्या वयातल्या ह्या सुखसंवेदना असतात त्या वयात पिढाला कसलेच विधिनिषेध माहित नसतात. या सुखसंवेदनाच्या नमुन्यावर नंतरच्या सुखवाचक कल्पना बतल्या जातात. या सर्व कल्पना मनाच्या आत घर करून असतात आणि त्या सर्वांचा संबंध कामवाचक प्रेरणेशी असतो. कारण ही प्रेरणा जागते तेव्हाच सुख मिळालेले असते.

आता प्रश्न असा की, शेवटी स्वप्नगुंफण कसे घडते? कारण आपण म्हणत आहोत की, कामवाचक प्रेरणेतून स्वप्न तयार होते. परंतु सर्वसाधारण बरीचशी स्वप्ने तर तशी वाटत नाहीत. मग खरे काय? स्वप्नाला कार्यप्रेरणा देणाऱ्या कामवाचक वासना व इच्छा मनाच्या अबोध भागात असतात. कारण त्या प्रत्येक व्यक्तीच्या बालपणी तयार होतात. हे तर आपण मागे पाहिलेच! तसेच या वासना विविध आहेत आणि त्यातून सुखसंवेदनांचे विविध प्रकार अभिप्रेत आहेत हेही आपण पाहिले. मूळ शरीरपोषणप्रेरणेतून विभागली जाऊन कामवाचक प्रेरणा तयार होते. तशी तयार होताना अनेक प्रकारच्या स्थित्यंतरातून ही प्रेरणा जाते. ही प्रेरणा ओष्ठ, गुद आणि जननेंद्रिय अशा तीन प्रदेशातून वाढत वाढत तयार होते. त्यामुळे तिचे परिणाम अनेक प्रकारचे असतात.

यातील प्रत्येक प्रभावी परिणाम म्हणजे सुखसंवेदनाची एक एक आठवणच होय. अशा अनेक आठवणी मनाच्या अबोध भागात असतात. व त्या प्रत्येक आठवणीच्या ठिकाणी ऊर्जा असते. आणि ही ऊर्जा जी कार्यप्रेरणा देते व त्यातून जी घटनांची मालिका सुरू होते त्या मालिकेचा शेवटचा टप्पा म्हणजे आपणाला झोपेत पडणारे स्वप्न.

आता मुद्दा असा की, हे स्वप्न कसे तयार होते ? त्याची रीत कोणती ? स्वप्नाचे दोन भाग असतात आणि त्यातील एक भाग जाहीर दृश्याचा तर दुसरा खाजगी स्फूर्तीचा हे वर आपण पाहिलेच. या दोन भागात खूपच तफावत असते. अप्रगट किंवा प्रच्छन्न भागाचे स्वरूप पाहिले व त्याच्याशी जाहीर भागाची तुलना केली तर त्या दोन्ही भागात काहीच साम्य आढळणार नाही. दृश्य स्वप्न हा अदृश्य भागाचा केवळ खोटा मुखवटा असतो. स्वप्नाच्या मागचा अदृश्य उद्देश स्वप्नातून जसाच्या तसा कधीच प्रगट होऊ शकत नाही. स्वतःचा खरा चेहरा लपवित्याबाचून त्याला बाहेर तोंडच दाखविता येणार नाही. म्हणून हा खोटा मुखवटा पांघरण्यात येतो. हा मुखवटा पांघरून [ Camouflage अहम्‌ची समजूत वाढती जाते की जे घडते आहे त्यात गह्यं असे काहीही नाही.

फ्रॉइड यांच्या स्वप्नविषयक सिद्धांताप्रमाणे प्रत्येक स्वप्नाच्या मागे काही ना काही कारण असते आणि कसला ना कसला उद्देश असतो. इंस्टिंक्टच्या बालसुलभ इच्छांचा परिपूर्ती हा स्वप्नांचा उद्देश मानल्यास स्वप्नाच्या खऱ्या चेहऱ्यावर हा जो मुखवटा चढविण्यात येतो त्याचे कारण काय हे पाहिले पाहिजे. स्वप्नाच्या पोटात जे सुप्त विचार असतात आणि ज्याना बाहेर पडायचे असते म्हणून स्वप्नाची व्यवस्था शेवटी केली जाते ते पोटातले विचार खऱ्या स्वरूपात बाहेर येत नाहीत हे तर आपण पाहिलेच ! जे स्वप्न आपण पाहतो त्यात हे विचार लपवून स्वप्न रचले गेलेले असते. आता प्रश्न असा की हे का करण्यात येते ? स्वप्नाला असे सोज्वळ रूप देण्याचे कारण कोणते ? फ्रॉइड म्हणतात की, जर असे सोज्वळ रूप स्वप्नातल्या दृश्याला दिले नाही तर 'मी' ( अहम् ) रागावेल. तो हा प्रकार खपवून घेणार नाही. 'मी' ला राजी राखण्यासाठी स्वप्नाच्या पाठीमागचे विचार स्वप्नात जसेच्या तसे दाखविले जात नाहीत. त्यांचे रूप पालटून ते थोडे सभ्य बनवून मगच त्याना व्यक्त करण्यात येते.

'मी' ला काही एक नैतिक दृष्टीकोन आहे. उलट कामवाचक प्रेरणा विकसित होत असता ती फक्त सुखसंवेदनेचा विचार करीतच होत असल्याने

तिला नीतिअनीतीचे वावडे नाही. कामवाचक प्रेरणेच्या घडणीचा मार्ग वेगळा आणि 'मी'च्या घडणीचा मार्ग वेगळा. कामवाचक प्रेरणा फक्त सुख हाच मुद्दा समोर ठेवून वाढते. आणि वाढताना वस्तुस्थितीकडे अजिबात लक्ष देत नाही. उलट 'मी, वास्तवावर लक्ष ठेवून वाढतो. त्यामुळे 'मी' ला स्वप्नाच्या पोटातले खरे विचार आणि त्या विचारांना चाळवणाऱ्या इंस्टिंक्टच्या बालसुलभ वासना यापैकी काहीच मानवले नसते. 'मी' ला ते सर्व निषिद्ध वाटले असते. कदाचित किळसवाणेही वाटले असते म्हणून या वासनांचे तिरस्करणीय रूप बदलून त्यांना सोज्वळ वेश चढविण्यात येतो.

मूळ निषिद्ध वासना आणि विचाराला सोज्वळ वेष चढविल्यामुळे एकाच वेळी दोन गोष्टी साधतात. ती कल्पना मनाशी रंगविण्याची, त्या-कल्पनेशी खेळून स्वतःचे समाधान करून घेण्याची इच्छा भागते. तसेच त्या कल्पनेचे खरे स्वरुप दिसले असते तर 'मी' ला जो मनस्ताप झाला असता तोही या क्लृप्तीने वाचविला जातो. म्हणजेच झोपलेल्याची झोप मोडता कामा नये हा जो स्वप्न पडण्यामागचा दुसरा उद्देश तोही सांभाळला जातो.

स्वप्ने कशी पडतात, त्यांचे रचनाशास्त्र कोणते याचा फ्रॉइड यांच्याइतका सखोल अभ्यास क्वचितच कुणी केला असेल. स्वप्नावर नजर ठेवणाऱ्या आणि स्वप्नात काही जास्ती कमी मजकूर असल्यास तो गाळून टाकणाऱ्या रखवाल-दाराची – सेन्सॉरची – कल्पना तर फ्रॉइड यांचीच. स्वप्नगुंफण ( Dream work ) म्हणजे इंस्टिंक्टचे गतिशास्त्रच. फ्रॉइड यांच्या मते स्वप्नगुंफणाच्या चार तऱ्हा आहेत. या चार तऱ्हात सगळी स्वप्ने बसविलेली असतात. उदा. (१) Condensation संक्षिप्तीकरण (२) Displacement मूळ जाग्यावरून दुसरीकडे सरकविणे–स्थानबदल (३) Representation of thoughts by visual pictures विचार दृक्‌चित्रात दाखविणे आणि (४) secondary elaboration मागाहून केला जाणारा कल्पनाविस्तार.

संक्षिप्तीकरण– स्वप्नाचे दोन भाग आपण केले आहेत. एक स्वप्ना-तल्या प्रसंगांच्या रूपात आपण पाहतो तो आणि दुसरा या भागाच्या पाठीमागे या भागाला स्फूर्ती देणारा भाग. स्वप्नातल्या प्रसंगाला स्फूर्ती देणाऱ्या भागाच्या आवाक्याची प्रत्यक्ष स्वप्नात चित्रित झालेल्या भागाशी तुलना करता स्फूर्ती देणारा भाग खूपच मोठा असतो असे दिसून येते. प्रत्यक्ष स्वप्नात जो आशय व्यक्त झालेला असतो त्याच्यापेक्षा जो आशय व्यक्त झालेला नसतो त्याचा आवाका फार मोठा असतो. स्वप्नात आलेली प्रगट हकिकत ही न

आलेल्या हकिकतीपेक्षा फार कमी असते. तेव्हा प्रत्यक्ष स्वप्नाबद्दल असे म्हणता येईल की, आपण पाहतो ते स्वप्न म्हणजे त्या स्वप्नाच्या मागील मोठ्या प्रचंड भागाचे संक्षिप्तिकरण होय. हे संक्षिप्तिकरणच कसे घडते ? तर एक म्हणजे जो बराच मोठा पसारा स्वप्नात प्रगट होण्यासाठी धडपडत असतो त्यातील कितीतरी भाग प्रत्यक्ष स्वप्नातून वगळून टाकण्यात येतो. दोन स्वप्नासाठी वापरावयाच्या साहित्यातील जे साहित्य बाजबीपेक्षा जास्त गुंता-गुंतीचे असते ते वगळून टाकण्यात येते. आणि जे साहित्य सहज हाताळता येईल असेच फक्त घेऊन त्याच्या मदतीने स्वप्न रचले जाते. तीन स्वप्नासाठी वापरण्याचे साहित्य खूप आणि विविध प्रकारचे असते. या विविध प्रकारच्या साहित्यातून ज्यात काही ना काही समान सूत्र असते असे साहित्य बाजूला काढण्यात येऊन त्यातून स्वप्न रचण्यात येते.

स्वप्नातला उघड भाग हा सुप्त भागापेक्षा तुलनेने त्रोटक असतो या म्हणण्याचा अर्थ उघड भाग हा सुप्त भागाचा सारांश असतो असा नव्हे. स्वप्नातल्या उघड भागाच्या प्रत्येक घटकाच्या पाठी अनेक प्रच्छन्न अर्थ असतात, तसेच प्रत्येक प्रच्छन्न अर्थाचा संबंध स्वप्नातल्या अनेक उघड घटकांशी जोडता येणे शक्य असते. मात्र प्रत्येक प्रगट घटक जरी प्रच्छन्न अर्थघटकांतून निघत असला तरी त्या अर्थ घटकांबरोबरचा त्यांचा संबंध वेगवेगळा असतो.

हे संक्षिप्तिकरण कसे घडते ? ते अनेक वेगवेगळ्या प्रकारे घडते. उदा. स्वप्नात वापरल्या जाऊ शकणाऱ्या साहित्यात अनेक व्यक्ती विचार विषयक कल्पना असल्या तरी त्यातील फक्त एकच व्यक्ती वा विचार ( म्ह. इतस्ततः पसरलेल्या अनेक घटकातील एक घटक) घेऊन त्याच्या भोवती स्वप्न गुंफण्यात येते. हीच कल्पना का घेतली जाते यालाही कारणे आहेत. स्वप्नात जे साहित्य एकत्रित गोळा करून सुगंठित व्हायचे असते त्या सगळ्या साहित्याशी जमेल असे तेवढ एकच सूत्र तेथे असते. व म्हणून तेवढे सूत्र घेऊन व त्याला केंद्र-बिंदूचा Nodal Poont चा दर्जा देऊन त्याच्या भोवती बाकीचे साहित्य जमविण्यात येते. याच्या उलटही कधी कधी घडते. उदा. कधी कधी परस्परांशी असंबद्ध असणारे घटक गोळा करून त्याच्यातून एक विजोड गोळाबेरीज बनविली जाते. (चित्रकलेतल्या संकलित आकृतीप्रमाणे ) किंवा अनेक वेगवेगळ्या कल्पना म्हणजेच त्या कल्पनांच्या प्रतिमा एकत्रित करून व त्या प्रतिमातला बोचणारा फरक दूर करून एक नवी प्रतिमा घडविली जाते. म्हणजे निर-निराळ्या प्रकारच्या प्रतिमातील फक्त समान लक्षणांच्या प्रतिमांचा उपयोग करून त्याचे स्वप्न बनविले जाते.

आपण येथे स्वप्नव्यापाराचा विचार करीत असल्याने संक्षिप्तीकरणाला स्वप्नगुंफणाचा एक प्रकार असे म्हटले आहे. वस्तुतः स्वप्नगुंफणाप्रमाणेच विनोद निर्मिती, स्वतःच्या नकळत आपणाकडून ज्या चुका घडतात त्या चुकांच्या घडण्यात, मानसिक आजाराच्या लक्षणात ह्याच प्रकार आढळू शकतो.

मनातल्या मनात मनाच्या निरनिराळ्या घटकांचे हे संक्षिप्तीकरण का व कसे घडते ? फ्रॉइड म्हणतात की मनाच्या ठिकाणी मनाच्या व्यापारांवर लक्ष ठेवण्याचे काम करणारी जी सेन्सॉरशिपची यंत्रणा आहे त्या यंत्रणेमुळे संक्षिप्तीकरण घडते. मात्र याचा अर्थ हृदय, नाक, कान, डोळे अशासारखा सेन्सॉर नावाचा अवयव शरिरात असतो असा मात्र नव्हे. तर मनातल्या वेगवेगळ्या घटकांच्या बाबतीत जे घडते त्या घडण्याला उद्देशून सेन्सॉर व सेन्सॉरशिप या कल्पना वापरण्यात येतात. सेन्सॉर असा कोणी अवयव आपल्या शरिरात नाही. मनात वावरणाऱ्या निरनिराळ्या कल्पना संक्षिप्त झालेल्या आपणास दिसतात आणि त्यावरून आपण असा तर्क काढू शकतो की हे घडण्यामागे काही एक निश्चित धोरण आहे व त्या धोरणाला अनुसरून मनातल्या साहित्याची काट-छाट, नवी जुळवाजुळव केली गेलेली आहे. ही नवी जुळवाजुळव सेन्सॉरशिप-सारखी असल्याने आपण सेन्सॉरशिप हा शब्द वापरला. जर का मनात राहून सेन्सरचे काम करणाऱ्या सेन्सॉरशिपची कल्पना आपण वापरली नाही तर मानसिक साहित्याचे जे संक्षिप्तिकरण घडते त्याचा उलगडा करता येणार नाही.

अर्थात संक्षिप्तिकरणाच्या बाबतीत हेही तितकेच खरे आहे की, मनाच्या अबोध थरावर जी मानसिक सामग्री वावरते तिचे नेहमीच संक्षिप्तिकरण केले जाते. कारण अबोध मनोव्यापाराचे ते प्राथमिक लक्षण आहे. मात्र संक्षिप्ति-करणात काही प्रकारच्या कल्पना, विशेषतः नैतिकदृष्ट्या आपल्या 'मी' ला खटकतील अशा कल्पना बाजूला काढून किंवा त्यांचा रोख बदलून टाकून त्यांची जी नवी मांडणी केली जाते त्याचे कारण मात्र सेन्सॉरशिप हेच आहे.

स्वप्नगुंफणाचा दुसरा भाग डिस्प्लेसमेंटचा. मानसिक सामग्रीचे हे डिसप्लेसमेंट मात्र केवळ सेन्सॉरशिपमुळेच घडून येते. अर्थाचा मूळ रोख बदलण्याचा हा प्रकार दोन वेगवेगळ्या पद्धतीने घडून येतो. स्वप्नाला दोन अंगे असतात हे वर आपण पाहिलेच. त्यातील बाहेरचे अंग हे वस्तुतः आतल्या अंगावर अवलंबून हवे. म्हणजे असे की, आतल्या अंगाचा एक छोटासा अंश वा तुकडा घेऊन त्याच्या साह्याने बाहेरचे तपशिलवार स्वप्न सजविले गेले पाहिजे. परंतु तसे न होता अनेकदा असे घडते की, आतल्या सुप्त अंगाशी ज्याचा अर्थाअर्थी कसलाच संबंध जोडता येणार नाही असे काहीतरी वेगळेच

घेऊन त्याच्या साहृयाने आतले अंग सूचित व चित्रित करण्याचा प्रयत्न होता. ही डिस्प्लेसमेंटची एक पद्धती झाली. दुसरी पद्धती अशी. स्वप्नात सुप्त अंगातल्या महत्वाच्या घटकावर जास्त भर दिला जाणे तर्कशुद्ध म्हणता येईल. परंतु अनेकदा अशा महत्वाच्या घटकाकडे दुर्लक्ष करुन एखाद्या वरवरच्या घटकावर प्रगट स्वप्नात लक्ष केंद्रित केले गेलेले असते. परिणामत: ज्या मुद्याभोवती ते स्वप्न खरोखर फिरत असत त्याच्यापेक्षा अगदी वेगळ्या मुद्याभोवती ते फिरत असल्याचा भास होऊन ते सगळे स्वप्न अपरिचित वाटू लागते.

मनोव्यापारातले डिस्प्लेसमेंट केवळ स्वप्नातच घडते असे नसून मनाच्या आजारपणातही ते घडते. किंबहुना मनाचे आजारपण ओळखण्याचे हे एक महत्वाचे लक्षण आहे. डिस्प्लेसमेंट ही अर्थशास्त्रीय कल्पना आहे. या कल्पनेत दुसरी दोन मानसिक तत्वे अंतर्भूत आहेत. यातील एक तत्व मनोविकाराचे [ affect ] चे व दुसरे मानसिक विचारकल्पनेचे [ idaea ] चे. समजा एखादी धक्कादायक घटना घडून तुम्हाला मानसिक धक्का बसला. आणि हा धक्का आठवणीतून काढुन टाकावा असे तुम्हाला वाटले तर तुम्ही काय करता ? तुम्ही ती विशिष्ट आठवण मनाच्या आत खोलवर दडपून टाकता. परंतु ही आठवण दडपून टाकता म्हणजे त्या आठवणीची जी कल्पना तुम्ही तुमच्या मनात धारण केली होती ती कल्पना दडपून टाकता. परंतु त्या घटने-बरोबरच जो आत्यंतिक तीव्र मनोविकार–क्रोध, संताप, घृणा, तिरस्कार स्वत:ची वा इतर कुणाची कीव इत्यादी-त्याचे काय ? तो मनोविकार आता कोठे जाईल ? कारण त्या मनोविकारालासुद्धा वाट हवी असेल. कारण तो मनोविकार म्हणजे उद्दिपित ऊर्जाच होय. ऊर्जा उद्दिपित झाली की, तिला वाट द्यावीच लागते. नाहीतर ती आतल्या आत घुमसत राहून इतर त्रास-दायक मार्गाने बाहेर पडण्याची शक्यता असते. अशा वेळी तुम्ही काय करता तर तो मनोविकार मूळ आठवणीपासून म्हणजे त्या आठवणीच्या कल्पनेपासून वेगळा काढता आणि इतर त्यातल्या त्यात निरुपद्रवी कल्पनाविचाराशी जोडून टाकता. कल्पना आणि मनोविकार किंवा ॲफेक्ट यांची फारकत ती हीच.

ही फारकत अर्थशास्त्रीय धाटणीवर चालते. म्हणजे असे की, एका ठिकाणी किंवा मुद्याशी संघटित झालेली ऊर्जा तेथून काढून दुसऱ्या मुद्यावर संघटित केली की पहिल्या मुद्याचे भावनिक महत्व कमी होऊन ज्या दुसऱ्या मुद्यावर ती एकवटते तो मुद्दा भावनिक महत्व पावतो. यावरून आणखी एक गोष्ट ध्यानात घेता येण्यासारखी आहे ती ही की एखाद्या घटनेचा कल्पना–



अनुक्रमणिका



विचार आणि त्या घटनेतून उद्दिपित होणारा मनोविकार वा अॅफेक्ट ही एकमेकांपासून अलग बनू शकतात. व अलगपणे राहूही शकतात. मनातल्या सामग्रीचे हे दोन स्वतंत्र घटक असू शकतात. एखादा मनोविकार समजा एखाद्या विशिष्ट परिस्थितीने व त्या परिस्थितीच्या विचारातून उत्पन्न झाला तरी तो विकार त्याच विचाराला कायम चिकटून राहिला पाहिजे असे नाही. तो विचार त्या मनोविकारापासून अलग होऊ शकतो आणि असा अलग होऊन दुसऱ्याही एखाद्या विचाराशी जुळू शकतो. काही विशिष्ट कारणाने उद्दिपित झालेली मानसिक ऊर्जा त्याच कारणात खर्ची पडेल असें नाही. कदाचित त्या कारणापासून ती ऊर्जा मोकळी सुटून दुसऱ्या कारणात गुंतेल. जागलेली मानसिक ऊर्जा एका मुद्याकडून निघून दुसऱ्या मुद्यावर एकवटू शकते.

स्वप्नगुंफणाचा तिसरा भाग म्हणजे विचारकल्पनेचे रुपांतर दृक्‌चित्रात घडवून आणणे. सगळेच विचार पूर्णपणे चित्रात रुपांतरित होऊ शकतात असे नाही. मनाची केवढीही इच्छा असली तरी मनाला चित्रात रुपांतरित करा-वासा वाटणारा सगळा विचार ( मजकूर ) चित्रात रुपांतरित होऊच शकेल असे नाही. स्वप्नात आपण अमूर्त म्हणजे शब्दात मांडलेले असतात तसले विचार पाहात नाही. तर चित्रे पाहातो. स्वप्नातला सगळा मजकूर चित्राच्या स्वरुपातला असतो. परंतु ही चित्रे मूळ सुप्त मजकुराबरहुकूम असतील असे नाही.

स्वप्नरचाईच्या ( Dream work ) कामाच्या स्वत:च्या काही अडचणी आहेत. त्यामुळे जो मूळ मजकुर ( प्रच्छन्न स्वप्न ) स्वप्नात चित्रमय रुपात चित्रित होऊन गेलेला असतो त्यात उणीवा राहतात. समजा सुप्त मजकुरातला काही भाग स्वप्नरचाईत बरोबर चित्रित होऊ शकत नसेल तर स्वप्न-रचाई आपले काम बंद करणार नाही. तर काही ना काही हिकमती लढवून तो मजकुर स्वप्नात आणण्याचा प्रयत्न ती करील. कधी मूळ मजकुराचा विपर्यास करील. किंवा त्याला अतिरंजित रुप देईल. किंवा मूळ मजकुराच्या उलट अर्थाचा मजकूर घालील. मूळ मजकूरातील व्यक्तींचा जो संबंध असेल तो उलटा फिरविला. जाईल. उदा. मेलेल्याला स्वप्नात जिवंत केले जाईल. किंवा जित्याला मारले जाईल. बापाचे रूपांतर मुलात होईल. बायकोची सासू बनेल किंवा आई बनेल. वगैरे.) किंवा कार्यकारणभाव पार उलटे करील. किंवा एखाद्या वस्तूचे रूपांतर तिच्या उलट अर्थाच्या वस्तूत करील. स्वप्न-रचाई असे वाटेल ते प्रकार करील. परंतु जो मजकूर स्वप्नात घालायचा आहे तो घालण्याचा प्रयत्न करील. अडचण आली म्हणून प्रयत्न सोडणार नाही.

स्वप्ने कशी पडू शकतील याची स्वप्नांची स्वत:ची काही पद्धत आहे. या

पद्धतीला धरूनच स्वप्ने पडतात. स्वप्नातला सगळा मजकूर-सगळे विचार केवळ - चित्रात बसविले जाऊनच व्यक्त होऊ शकतात. स्वप्नात निखळ संकल्पनात्मक अमूर्त विचार येऊ शकत नाहीत. तर अशा विचारांसाठी तेथे चित्रे असतात. स्वप्नातला सगळा आशय, मग तो आशय कितीही अमूर्त असू द्या, तो चित्रांच्या अंगानेच व्यक्त होतो. तेथे भाषणे, संवाद, शब्द हे भाषणे, संवाद, शब्द म्हणून व्यक्त होत नाहीत. स्वप्नात त्यांचे रूपांतर चित्रात घडते. आणि चित्र म्हणून ते आपणासमोर येतात. तेव्हा कोणत्याही मजकुराला शब्द म्हणून स्वप्नात स्थान नसते तर त्या शब्दाना अर्थपूर्ण चित्र म्हणून स्थान असते.

स्वप्नामागच्या मुख्य कल्पनाविचाराला चिकटून असणाऱ्या दुय्यम विचारांपैकी जे विचार दृक्प्रतिमात मांडता येण्यासारखे असतात, फक्त तेवढ्यानाच येथे संधी मिळते. साहजिकच मळ मजकुरात जी काही नैसर्गिक तर्कसंगती असेल ती हे घडताना मोडली जाते. किंवा गाळली जाते आणि अगदी वेगळ्या तर्कपद्धतीने सगळा मजकूर चित्रित होतो. दोन विचारांचे रूपांतर चित्रात घडवून आणण्यासाठी विचाराना पर्याय म्हणन जे चित्र निवडण्यात आलेले असते त्या चित्राकडे तो विचार ढकलण्यात येतो. स्वप्नरचाईत अर्थावर लक्ष केंद्रित करून अमूर्त कल्पनाविचार आणि इंद्रियगम्य प्रतिमांवती या दोघात एक पूल साधण्याचा प्रयत्न केला जातो. (समजा उमराव ही कल्पना स्वप्नात व्यक्त करायची आहे, तर स्वप्नरचाईचे काम कसे घडेल? उमराव या कल्पनेत उच्च पदस्थ असा अर्थ आहे. उमराव या कल्पनेपासून प्रथम हा अर्थ बाजूला काढण्यात येईल. आणि आता ‘ उच्च पदस्थपणा ’ हा अर्थ दाखविण्यासाठी स्वप्नात ‘ उंच मनोऱ्याच्या ’ चित्राची योजना केली जाईल. )

या सगळ्या घडामोडीत परत आणखी दोन कल्पना अनुस्यूत आहेत. एक Thing Presentation आणि दुसरी Word Presentation ची फ्राइडच्या शास्त्रात मनाच्या रचनेचे जागृत किंवा बोधमन, अर्ध जागृत किंवा अर्धबोध मन आणि निद्रिस्त सुप्त किंवा अबोध मन (Conscious-Preconscious-unconscious ) असे तीन भेद करण्यात येतात हे आपणास माहितच आहे. फ्रॉइड यांच्या मते कोठलेही मन प्रारंभी अस्ताव्यस्त किंवा रचना नसलेले असते. किंवा प्रारंभी मन ही ऊर्जेची गोळाबेरीज व्यवस्था असते दुसऱ्या शब्दात सांगायचे तर आपण बोध-अर्धबोध-अबोध असे जे मनाचे नेटके भाग पाडले तसले काहीही प्रारंभी नसते. तर प्रारंभी मन म्हणजे केवळ ऊर्जा

असते. या ऊर्जेच्या गोळाबेरजेला फ्रॉइड इड असे नाव देतात. कारण ही गोळाबेरीज लिंगभेदातीत असते. जसजसे पिंडाचे वय वाढत जाते आणि त्याबरोबर अनुभवाची व्याप्ती आणि प्रकार वाढत जातात तसतसे या मुळच्या अखंड गोळा बेरजेत इगो आणि सुपरइगो असे स्वतंत्र आणि तुलनेने नेटके भाग तयार होतात. किंवा मनात इगो आणि सुपरइगो अशा व्यवस्था तयार होतात.

तेव्हा मनाच्या बाबतीत प्रारंभीचे ऐसपैस आणि ऊर्जायुक्त अखंड मन किंवा इड म्हणजे पहिली अवस्था. ही अवस्था सर्वस्वी अबोध असते. हळूहळू या अवस्थेतून इगोची व्यवस्था उत्क्रमित होते. इगो म्हणजे पिंडाची स्वतःच्या 'मी' विषयीची-अहम् विषयीची जाणीव. या मी विषयक जाणिवेतून काही भाग वेगळा पडून त्यातून सुपर-इगो किंवा अतिअहम ही नवी व्यवस्था उत्क्रमित होते.

केवळ जाणीव असणे हेच एक लक्षण विचारात घेतले आणि मनाचा विचार केला तर असे म्हणता येईल की, इड ही पहिली अवस्था. म्हणून ती पूर्णतः अबोध असते. त्याच्या उलट जे जाणिवेत असते ते जाणिवेत असल्याने बोध अवस्थेत असते. तर जे त्या विशिष्ट क्षणी जाणिवेत नसते परंतु म्हटल्यास जाणिवेत आणता येऊ शकते ते अर्धबोध अवस्थेत असते.

आता प्रश्न असा आहे की, काही मनाला प्रथम जेव्हा जाणवते तेव्हा ते कसे जाणवते ? यात दोन भाग मोडतील. एक वस्तूचे जाणवणे आणि दुसरे शब्दाचे जाणवणे. अर्थात बोध मनाला वस्तु वा शब्द जसे जाणवतील त्यापेक्षा वेगळ्या प्रकारे ते अबोध मनाला जाणवतील हे तर ओघानेच आले. तेव्हा एखादी वस्तु बोध आणि अबोध वा बोधपूर्व मनाला कशी जाणवेल हा महत्वाचा प्रश्न आहे. फ्रॉइड यांच्या मताप्रमाणे अबोध मनाला वस्तु ही वस्तुरूपी चित्राच्या रुपात जाणवते, अबोध मनाला जाणवणारी कल्पनाही वस्तूची प्रतिरूपणात्मक ( Representational ) कल्पना असते. उलट बोध आणि बोधपूर्व अवस्था या शब्दांना अनुसरून अथवा शाब्दिक कल्पनांच्या सहवासात वाढल्या असल्याने त्यांना जे काही जाणवते ते शाब्दिक प्रतिमांच्या स्वरूपात जाणवते.

प्रारंभी संपूर्ण मन हा उर्जेचा एक अखंड गोळा असतो. पुढे पर्यावरणाशी जमवून घेत जात असताना त्यातील काही भाग सबोध बनून सतत बोधाबरोबर राहू लागतो. किंवा बोधावस्थेच्या जवळपास राहू लागतो. मूळ गोळ्याच्या स्वरूपातला मनाचा भाग बाहेरच्या जगातले जे काही पाहतो ते



अनुक्रमणिका

ते पाहायच्या वस्तुचे चित्र म्हणून पाहतो. म्हणजेच हे मन पाहिलेल्या वस्तुची प्रत्यक्ष चित्रे, त्यांच्या प्रतिमा पाहून ती चित्रे वा प्रतिमा ध्यानात ठेवते. उलट (बोध व बोधपूर्व मन ) पर्यावरणाशी जमवून घेत वाढते. म्हणजेच बाहेरच्या प्रत्यक्ष जगाशी ते सरळ सरळ व्यवहार करते. हा व्यवहार ते शब्द व संज्ञांच्या आणि तार्किक विधानांच्या मदतीने करते. आणि हा व्यवहार करता करता बदलतही (modify) जाते. हे शाब्दिक प्रतिमातून घडते.

येथे दोन तीन गोष्टी लक्षात ठेवण्यासारख्या आहेत. एक, बोध आणि अबोध या मनाच्या दोन बाजू होत. दोन, या दोन्हीही भागाना कल्पना जाणवतात किंवा हे दोन्हीही भाग कल्पनेच्या साह्याने जगाशी व्यवहार करतात. (कल्पना– Idea हा शब्द फ्राइड तांत्रिक अर्थाने वापरतात. आपण आपल्या स्वतःच्या मनाशी जे पाहतो. त्या पाहण्याला फ्रॉइड कल्पना हा शब्द वापरतात. फ्रॉइड म्हणतात की, आपण पाहतो तेव्हा एक कल्पना आपल्या मनाशी पाहतो पूर्वी अनुभविलेले काहीही जेव्हा परत आपण आपल्या मनात आणतो तेव्हा ते कल्पनेच्या रूपात आणतो. असे फ्रॉइडना सांगायचे आहे, कल्पना शब्दाचा मूळ शब्दकोशी अर्थ जरी फ्रॉइड बदलत नाहीत तरी तो शब्द ते स्वतःच्या खास विशिष्ट अर्थछटेने मात्र वापरतात. ) तेव्हा सांगायचे काय तर बोध आणि अबोध दोन्हीही मने जगाबरोबरचा स्वतःचा व्यवहार 'कल्पना' याच वस्तुच्या द्वारा करतात. 'कल्पना' राबविण्याच्या दोन्ही मनांच्या पद्धती भिन्न आहेत, दुसऱ्या शब्दात, कल्पना या दोन मनाना दोन वेगवेगळ्या प्रकारे प्रतीत होतात. तीन, बोध मन बाहेरच्या जगाशी संपर्क ठेवून त्या अंगाने वाढते. म्हणून बोध मनावर बाहेरच्या जगाचा आणि व्यवहाराचा प्रभाव असतो. उदा. लहान मुलाला जगातल्या वस्तूंची ओळख करून देताना प्रथम त्या त्या वस्तूचे नाव उच्चारून मग त्या त्या वस्तूचा निर्देश आपण करतो. हे झाड, ही खुर्ची, तो घोडा, वगैरे. अशा प्रत्येक प्रसंगी त्या त्या वस्तुपेक्षा सुद्धा त्या त्या वस्तूचे आपण घेतलेले नाव अधिक वजनदार असते. त्यामुळे ती वस्तू मनाला चिकटण्याऐवजी ते नाव मनाला अधिक घट्टपणे पकडते. येथे 'कल्पना' म्हणजे हे शब्दातले, शब्दरूपी नाव त्याच्या उलट, अबोध मनाच्या बाबतीत. कल्पना म्हणजे त्या त्या वस्तूची प्रतिमारूपी कल्पना. अबोध मन शब्दरूपी माध्यमातून जग पाहात नाही, तर ते मन सरळ सरळ कशाच्याही मध्यस्थिविना जग पाहते, म्हणून अबोध मनाच्या बाबतीत कल्पना म्हणजे प्रत्यक्ष वस्तुप्रतिमा होय. चार अबोध पाहण्यात कुणाच्या मध्यस्थिविना पाहणे घडते, बोध पाहण्यात कोणीतरी नामानिर्देश करतो



अनुक्रमणिका



आणि त्या नामनिर्देशाच्या अनुषंगाने पाहणे घडते:- खुर्ची: आणि आपण खुर्चीशब्दामागोमाग खुर्ची नावाची वस्तु पाहतो. म्हणून अबोध पाहणे हे थिंग-प्रेझेंटेशनच्या स्वरूपातले असते. बोध पाहणे वर्ड-प्रेझेंटेशनच्या स्वरूपातले असते. पाहण्याच्या या प्रकारात मनाच्या पेटीत शब्दप्रतिमा साठविण्यात येतात. पाच वस्तु-प्रतिरूपणात (किंवा थिंग–प्रेझेंटेशन वा रिप्रिझेंटेशन) त्या त्या वस्तुप्रतिमेत ऊर्जा पकडून राहाते. याचाच अर्थ असा की, ऊर्जा त्या प्रतिमेत अडकून राहिल्याने त्या प्रतिमेला भावनिक महत्व येते. ती प्रतिमा वा चित्र भावनिक दृष्टया प्रभावी ठरते. याच्या उलट अवस्था शाब्दिक–प्रतिरुपणाची असते. येथे प्रत्यक्ष वस्तुपेक्षा तिच्या नावाला म्हणजे त्या विशिष्ट वस्तु-वाचक शब्दाला प्राथमिक महत्व असते. कारण प्रथम ते नाव किंवा तो शब्द आणि मागाहून त्या शब्दावरून ती वस्तू असा लक्षात ठेवण्याचा क्रम असल्याने शब्द जेवढा भावनोद्दिपक असेल तेवढी ती प्रत्यक्ष वस्तु नसेल. शिझोफ्रेनियाच्या रुग्णाचे उदाहरण येथे देता येईल. हे रुग्ण प्रत्यक्ष वस्तुपेक्षा शब्दाना अधिक तीव्रतेने react होतात. कारण रूपक आणि प्रत्यक्ष वस्तू यातला भेदच त्यांच्या दुभंगलेल्या मनाला कळत नाही. रुपकालाच ते प्रत्यक्ष वस्तुस्थिती मानू पाहतात, झोपेत बोध मन निद्रिस्त बनून शिथिल झालेले असते, त्यामुळे प्रत्यक्ष आणि काल्पनिक याच्यातला भेद कळण्याची आपली शक्ती लटकी पडलेली असते. म्हणून झोपेत आपण जो चित्रे पाहतो त्या चित्राना तो जणू प्रत्यक्ष वस्तुस्थिती आहे अशाप्रकारे प्रतिसाद देण्याचा प्रयत्न आपणाकडून केला जातो. सापाचे स्वप्न पडले तर आपणाला दरदरून घाम सुटतो. अशीच अवस्था पण जागेपणी शिझोफ्रेनियाच्या रुग्णांची होते. ते काही शाब्दिक कल्पना म्हणजे विचार डोक्यात घोळवतात आणि मग त्याना असे भासत राहाते की तो विचार हा विचार नसून वस्तुस्थितीच खरोखर तशी आहे. उदा. त्याना समजा वाटत असले की, सगळे जग आपला शत्रू आहे. तर हा एक विचार आहे याचे भान त्याना राहात नाही. तर हा विचार आहे, किंवा ही एक अमूर्त शाब्दिक कल्पना आहे ही गोष्ट ते विसरतात आणि जणू काही प्रत्यक्ष वस्तुस्थितीच ते पाहात आहेत अशा प्रकारे त्या अमूर्त कल्पनेला ते प्रतिसाद देतात. मग रस्त्याने चालताना संशयाने ते वारंवार मागे वळून पाहतील. त्यांच्या बाजूने सहज कोणी चालत गेला तरी भयंकर घाबरून जातील. इत्यादी.

व्यक्तिमत्वाचे शरीर आणि मन असे दोन भाग केले तर शरीराला किंवा शिराला जे जाणवले ते मनाला कसे प्रतीत होते असा हा प्रश्न आहे. या

प्रश्नावर फ्रॉइडचे उत्तर असे आहे की, जे पिंडाला जाणवले ते मनाला त्याच प्रकारच्या चित्राच्या स्वरूपात जाणवते. म्हणजे पिंडाला काय वाटत आहे याची कल्पना लगेच मनाला येते. पिंडाला काय हवे हे समजून आले की, ते मिळवून देण्यासाठी मन प्रयत्न करू लागते. पिंडाचे म्हणणे मनाला कळविणाऱ्या या ज्या खुणा त्या खुणांना फ्रॉइड Idea किंवा कल्पना किंवा Representation म्हणतात. आपण अमूर्त विचारांना कल्पना हा शब्द लावतो. परंतू फ्रॉइड कल्पना या शब्दाला स्वतःची कलाटणी देतात. फ्रॉइड ज्याला कल्पना म्हणतात त्या कल्पना इडव्यवस्था आणि इगो-व्यवस्था या दोन व्यवस्थांमध्ये संदेशाची देवाणघेवाणाचे काम करतात. इडचे मागणे कल्पनांद्वारा इगोला कळविण्यात येते. या कल्पना ऊर्जाभरित असतात. आपण ज्यांना कल्पना म्हणतो त्या विचारकल्पना ऊर्जाभरित नसतात. फ्रॉइड ज्यांना कल्पना म्हणतात त्या कल्पनांमुळे भावनोद्रेक घडू शकतो. कारण त्यांच्यामध्ये ऊर्जेचा साठा असतो. या ऊर्जाभरित कल्पनांचे एक वैशिष्ठ्य आहे. एका कल्पनेमागची ऊर्जा अलग होऊन दुसऱ्या कल्पनेला चिकटू शकते. समजा एखाद्या मानसिक धक्क्याने कुणाला काही एक मानसिक आजार झाला. तर तो धक्का कायमच त्याच्या मनात राहील असे नाही. अनेकदा असे होते की, तो धक्कादायक प्रसंग मन पार दडपून टाकते, आणि त्या प्रसंगाची आठवण आणि बरोबरची ऊर्जासुद्धा दुसऱ्याच एखाद्या निरुपद्रवी कल्पनेला चिकटते आणि ती निरुपद्रवी कल्पना उपद्रवकारक होते.

अनुभव घेण्याचे हे असे दोन प्रकार आहेत. आणि ते परस्परभिन्न आहेत. आपले बोध मन वैचारीक कल्पनांच्या मध्यस्थीने अनुभव घेते. तर अबोध मन चित्रमय खणांच्या किंवा फ्रॉइडप्रणीत कल्पनांच्या मध्यस्थीने अनुभव घेते. बोध मन प्रत्यक्ष अनुभव घेत नाही. तर शाब्दिक कल्पना वापरून अनुभव घेते. अबोध मन अशा प्रकारच्या शाब्दिक कल्पनांच्या कुबड्या वापरीत नाही. ते जे अनुभवायचे ते सरळ सरळ कसल्याही प्रकारची तिसरी मध्यस्थी न वापरता अनुभवते. अनुभवव्यापारात हे दोन प्रकार असल्याने अनुभव आठवण्याच्या प्रक्रियेतही हे दोन फरक दिसतात. बोध मन शाब्दिक कल्पनांच्या साहाय्याने गत अनुभव आठवते तर अबोध मन त्यासाठी चित्ररुपी कल्पनांचा वापर करते.

बाल्यावस्थेत मनुष्यप्राणी सर्वस्वी अबोध पातळीवर जगत असल्याने त्याला एखादी प्रत्यक्ष वस्तु आणि त्या वस्तुचे कल्पनेतले चित्र यातला फरक पटकन कळत नाही. कल्पनेतले चित्र त्याला वस्तुस्थितीनिदर्शक







वाटते आणि खऱ्या वस्तुस्थितीला जो प्रतिसाद द्यावा तो प्रतिसाद मूळ त्या चित्रप्रतिमेला देते.

आपण स्वप्नगुंफणाबद्दल बोलत होतो. स्वप्नगुंफणाची क्रिया चार भागात घडते. जीवन जसे आपण अनुभवतो तसे ते स्वप्नात मांडले जात नाही. तर जीवनातल्या अनेक प्रसंगातील थोडा थोडा भाग घेऊन त्यांच्या साहाय्याने कधी स्वप्ने बांधली जातात. तर कधी खूप मोठ्या साहित्याचा संक्षेप करून त्या संक्षेपातून स्वप्ने बांधली जातात. हा संक्षेप करताना प्रतीकपद्धतीचा अवलंब केला जातो मूळ माहिती किंवा संदेश जसा असेल तसा तो न देता स्वप्नयंत्रणा तो संदेश प्रतिकात बसवून मगच तो स्वप्न पाहाणाराच्या ' मी ' पुढे मांडते.

स्वप्नाचे दोन भाग असतात. एक प्रगट म्हणजे स्वप्नदृश्यांच्या स्वरुपात आपण अनुभवतो तो आणि दुसरा त्या स्वप्नदृश्यांच्या मागे राहून ती दृश्ये क्रमाने, पद्धतीने वगैरे मांडली जावीत म्हणून व्यवस्था करणारा तो स्वप्नविचाराचा भाग होय. प्रगट भागापेक्षा हा प्रच्छन्न भाग अधिक शक्तिमान असतो. तसेच त्याची व्याप्तीसुद्धा खूप मोठी असते. केवळ प्रगट स्वप्नाच्या व्याप्तीकडे पाहून प्रच्छन्न स्वप्नाच्या व्याप्तीची कल्पना करता येणार नाही. स्वप्नाच्या प्रच्छन्न भागाला जो मुद्दा महत्वाचा वाटत असेल तोच प्रगट स्वप्नात प्रतिबिंबित होऊ शकेल असे नाही. प्रगट स्वप्न वरवर पाहाता अत्यंत निरुपद्रवी आणि निरागस वाटेल. परंतु त्याचे विश्लेषण करता त्यातील उपद्रवकारक, भयंकर आणि धक्कादायक भाग दिसून येईल. प्रगट स्वप्न साधे, सरळ वाटेल. तर त्याच्यामागील प्रच्छन्न भाग अत्यंत गुंतागुंतीचा असेल. प्रच्छन्न भागाला विविध छटा असू शकतात. यातील फारच थोड्या छटा प्रगट स्वप्नात उतरतात. प्रच्छन्न भागातले फारच थोडे घटक प्रगट स्वप्नात वापरले जातात. ज्या घटकांमध्ये काही ना काही स्वाभाविक साम्य आहे असे घटक निवडून आणि त्यांचे एकत्रिकरण करून त्यातून प्रगट स्वप्न रचण्यात येते.

स्वप्नगुंफणामध्ये असे दोन तट का पडतात ही एक विचार करण्यासारखी गोष्ट आहे. वस्तुतः जे आपण जागेपणी पाहतो तेच झोपेतही पाहिले जाण्यात अडचण असता कामा नये होता. परंतु जागेपणी ज्या प्रकारे आपण जगतो तसे झोपेत आपण जगत नाही. जागेपणी बऱ्याच प्रमाणात आपण रोखठोक विचार करू शकतो. ते विचार बोलून दाखवू शकतो. पण स्वप्न असा रोखठोक विचार करीत नाही. स्वप्नयंत्रणा प्रतिकांच्या मदतीने म्हणजे आडवळणाने



अनुक्रमणिका

बोलते. स्वप्नयंत्रणा रोखठोक बोलत नाही. फ्रॉइड म्हणतात की, जागेपणी आपण स्वतःच स्वतःच्या विचारावर नियंत्रण ठेवतो. त्यांच्यावर लक्ष ठेवून त्याना वाटेल तिकडे भरकटू देत नाही. परंतु झोपेत हे नियंत्रण शिथिल होते आणि हे नियंत्रण शिथिल झाले की, मन आणि विकार मोकाट धावू लागतात. विकारांचे हे मोकाट धावणे जर जसेच्या तसे चित्रित होऊ शकले तर आपल्या 'मी' ला नैतिक धक्का बसेल. हा नैतिक धक्का बसून झोपमोड होऊ नये म्हणून स्वप्नांवर अंमल चालविणारा एक नैतिक रखवालदार ज्याला फ्रॉइड सेन्सॉर किंवा पूर्वतपासनीस म्हणतात–प्रत्येकाच्या मनाम कार्य करीत असतो. हा पूर्वतपासनीस मनाच्या संदुकीतून कोठली सामग्री स्वप्नाच्या रूपाने बाहेर येऊ द्यायची या कामावर देखरेख चालवतो. वाटेल त्या सामग्रीला तो स्वप्नात जाऊ देत नाही. तर जी सामग्री त्याच्या दृष्टीने कमी धक्कादायक असेल, झोपलेल्याच्या नैतिक कल्पनाना जी धक्कादायक ठरणार नाही अशाच कल्पनेला तो स्वप्नाच्या वाटेने बाहेर उघडयावर जाऊ देतो. बाकीची सगळी, उपद्रवकारक सामग्री तो मागच्या मागे रेटतो. या पूर्वतापसनिसाच्या अंमलामुळे आणि जाचामुळेही जी सामग्री लज्जास्पद, नैतिक दृष्टचा निषिद्ध वाटणारी असते ती बाहेर येण्यासाठी आडमार्गाचा अवलंब करते. आपण वर पाहिलेच की, मनात घर करून असणाऱ्या अनेक कल्पनाना भावनिक ऊर्जा चिकटून असते. म्हणजेच हे सगळे कल्पनाविचार गत्यात्मक असतात. आणि ते गत्यात्मक असल्याने त्याना एके जागी घट्ट बसून राहता येत नाही. त्याना बाहेर पडायचे असते. पण पूर्वतपासनिस त्याना त्यांच्या मूळ ठेवणीत बाहेर येऊ देत नाही. मग हे कल्पनाविचार आपला वेष पालटतात. सोज्वळ, सभ्य पोशाख चढवतात आणि अशा प्रकारे सभ्य वेषात स्वप्नावाटे बाहेर येतात.

स्वप्नगुंफणाच्या तिसऱ्या भागात कल्पनाविचाराचे रूपांतर दृक्‌प्रतिमामालिकेत करण्यात येते. म्हणजे असे की, अबोध मनाच्या आत समजा काही एक कल्पनाविचार आहे. या कल्पनाविचाराच्या ठायी मानसिक ऊर्जा गुंतून आहे आणि हा विचार बाहेर उघडयावर येऊ पाहात आहे. मुळात हा विचार काही ना काही कारणाने समजा अबोध मनात दाबून टाकला गेला असेल तर बाहेर येण्यासाठी त्याला खूप प्रयास करावे लागतील. परंतु हा विचार बाहेर येण्यासाठी प्रयास करीत आहे याचाच अर्थ त्याच्यामुळे कसले ना कसले स्वप्न तयार होणार आहे. म्हणजे अबोध मनाच्या आत घर करून असणारे हे विचार स्वप्नगुंफणाच्या क्रियेला चालना देतात, आणि मग त्या चालनेकडून सूचना



अनुक्रमणिका



घेऊन मन स्वप्नदृश्ये तयार करते. यात परत आणखी एक अडचण आहे. मनाच्या आत बरेच कल्पनाविचार घर करून असतात आणि ते सर्व गत्यात्मकही असतात. परंतु ते सर्वच दृश्यप्रतिमात रूपांतरित होऊ शकत नाहीत. काही दृश्य प्रतिमात बसविताच येत नाहीत. तर काही अध्यांमुळे स्वरूपात दृश्यप्रतिमात रूपांतरित होऊ शकतात. जे विचार जसेच्या तसे स्वप्नदृश्यात रूपांतरित होऊ शकत नाहीत त्यांचे रूप पालटून त्यांना स्वप्नात वाव देण्यात येतो. समजा, एखाद्या इसमाला त्याचे प्रत्यक्ष जन्मदाते वडील साक्षात राक्षसागत वाटत आहेत. परंतु ही कल्पना तो जागेपणी सोडा पण झोपेतही स्वतःशी उघडपणे कबूल करू शकत नाही. परंतु त्या कल्पनेचे त्याच्या मनावरचे दडपण मात्र खूपच असून दिवसेंदिवस ते वाढत आहे. अशा वेळी ह्या कल्पनाविचार त्याला स्वतःशी बोलून दाखविल्यावाचून मत्वंतरच राहत नाही. मग तो मध्यम मार्ग काढतो व स्वप्नात हा विचार स्वतःशी बोलून दाखवतो. परंतु तेथेही तो स्वतःच्या वडिलांना राक्षस बनवून तो विचार बोलून दाखविणार नाही. तर तेथे काहीतरी हातचलाखी करून म्हटले तर वडीलांना आपण राक्षस म्हणत आहोत आणि म्हटले तर तसे काहीच आपण केलेले नाही अशा प्रकारे तो हे काम पार पाडतो. म्हणजे असे की, स्वप्नात तो राक्षसी रेडा स्वतःच्या पाठीस लागला आहे व आपण घर सोडून जोराने कोठेतरी पळत जात आहोत असे दृश्य तयार करून स्वतःचे समाधान करून घेईल आणि वडिलांना राक्षस म्हटल्याने होणारा त्याचा राग टाळण्याचे कामही साधेल.

प्रत्यक्ष जे स्वप्न आपण पाहातो ते स्वप्न पडण्याच्या किंवा ते स्वप्न गुंफण्याच्या तंत्राचे तीन प्रकार वर आपण पाहिले. असाच आणखी चवथाही तंत्रप्रकार प्रकार आहे.

स्वप्न पडण्याच्या वेळी जो मनोव्यापार घडून येतो त्या मनोव्यापाराचे दोन स्वतंत्र भाग असतात हेही आपण वर पाहिले आहे. स्वप्न पडण्याच्या वेळच्या मनोव्यापारात एका बाजूला dream thoughts उत्पन्न होतात. म्हणजे स्वप्नाला प्रवृत्त करणारे विचार उत्पन्न होतात. तर दुसऱ्या बाजूला या स्वप्नविचारांचे रूपांतर उघड स्वप्नात घडविणारा व्यापार घडून येतो. या दुसऱ्या भागाला प्रत्यक्ष स्वप्नगुंफणाचा भाग म्हटले जाते, आणि त्याचीच तीन तंत्रे वर आपण पाहिली. ती म्हणजे, पहिले स्वप्न-सामग्रीच्या संक्षिप्तीकरणाचे. संक्षिप्तीकरणात दोन वा दोहोंपेक्षा अधिक प्रतिमा एकत्रित करून त्यांच्या संयोगातून एक विपरीत संयुक्त प्रतिमा तयार होते. ही प्रतिमा अर्थपूर्ण असते.

आणि हा अर्थ ती ज्या दोन ( वा अधिक ) प्रतिमांच्या संयुक्तिकरणातून बनलेली असते त्या प्रतिमांकडून ती घेते. तसेच ही संयुक्त प्रतिमा ऊर्जायुक्त असते. ही ऊर्जासुद्धा त्याच मूळ दोन प्रतिमांकडून तिने घेतलेली असते. या सगळ्या मनोव्यापाराला संक्षिप्तीकरण असा शब्द वापरला जातो. संक्षिप्तीकरणाचा व्यापार हा primary process आहे. म्हणजे हा मनोव्यापार अबोध मनाकडून घडतो. अबोध मनोव्यापारात प्रतिमांचे संक्षिप्तिकरण घडते. स्वप्ने पडणे किंवा मानसिक आजारात आजारलक्षणे दिसू लागणे या प्रकारच्या अबोध मनोव्यापारात संक्षिप्तिकरणाची क्रिया घडते. मात्र संक्षिप्तिकरण म्हणजे अबोध मनातल्या सामग्रीचा सारांश तयार केला जाणे नव्हे. अबोध मनातली सामग्री वापरून त्याचे स्वप्न बनते. स्वप्न हा थोडक्यातला खेळ असतो. तर ज्या सामग्रीच्या संक्षिप्तिकरणातून ते स्वप्न बनते ती सामग्री खूपच मोठी असते.

स्वप्नगुंफणाचे दुसरे कळसूत्र [ mechanism ] डिस्प्लेसमेंटचे. हाही मनोव्यापार मनाच्या अबोध भागाशीच संबोधित असतो. मनातल्या प्रतिमा स्वत:मध्ये मानसिक ऊर्जा वागवितात हे तर आपणाला माहित आहेच. जर तसे नसते तर एखाद्या विशिष्ट प्रतिमेच्या प्रभावाखाली आल्यानंतर माणसे जशी अस्वाच्या सव्वा वागतात तशी ती वागली नसती. प्रतिमेच्या ठिकाणची ऊर्जा त्याना तसे वागवयास लावते. कधी कधी असे घडते की, एका प्रतिमेला चिकटून असलेली ऊर्जा तेथून निघून दुसऱ्या प्रतिमेला धरते आणि आता तो मनुष्य त्या नव्या प्रतिमेच्या तंत्राने वागतो. स्वप्नामध्ये एक प्रतिमा दुसऱ्या प्रतिमेचे कार्य करते किंवा प्रतिक म्हणून त्या दुसऱ्या प्रतिमेसाठी कार्य करते या ठिकाणी पहिल्या प्रतिमेने दुसरीला डिस्प्लेस केलेले असते. मनातल्या प्रतिमा एकमेकीला बाजूला ढकलून एकमेकींच्या जागा घेऊ शकतात; तसेच एकमेकींची ऊर्जाही वापरू शकतात म्हणूनच मानसिक शक्तीचे उन्नयन किंवा उदात्तीकरण घडू शकते. मानसिक शक्ती समजा 'अ' व्यापाराकडे लावण्याऐवजी तिचा ओघ वळवून ती 'ब' व्यापाराकडे लावली जाते आणि अशा प्रकारे तिचे उदात्तीकरण घडविता येते. प्रतिकीकरण आणि उदात्तीकरण या दोन्ही प्रक्रिया डिस्प्लेसमेंटच्या मनोव्यापारावर अवलंबून असतात.

स्वप्नगुंफनाचे तिसरे कळसूत्र प्रतिकीकरणाचे. प्रतिकीकरणाचा मनोव्यापारदेखिल मनाच्या अबोध भागाशीच संबंधित असतो. किंवा प्रतिकीकरण हे अबोध मनाचे लक्षण आहे असेही आपण म्हणू शकतो. स्वप्ने आणि मानसिक आजाऱ्यांच्या आजार लक्षणात प्रतिकीकरणाच्या खुणा पाहाता येतात. अबोध



अनुक्रमणिका

मन तार्किक भाषेत बोलत नाही. ते नेहमी प्रतिकांच्या साहाय्याने बोलते. समजा एखाद्या इसमाचा कामविकार अत्यंत प्रज्वलित झाला आहे तर त्याला स्वप्नात बेकाम झालेल्या घोडयाचे दृश्य दिसेल. अबोध मनाला बोध 'मी' ला जो संदेश सांगायचा असतो तो संदेश ते मन कधीही उघड भाषेत सांगत नाही तर अबोध मन त्यासाठी प्रतिकाचा आश्रय घेते आणि प्रतिकाच्या आश्रयाने आपला मुद्दा सांगते.

स्वप्नगुंफणाचे चवथे कळसूत्र, Secondary elaboration हे होय. पहिले तीन मनोव्यापार जर अबोध मनाशी संबंधित धरले तर हा चवथा मनोव्यापार बोध मनाशी संबंधित असतो. तर्कसुसंगतता ही बोध मनाची गरज होय. परंतु तर्कसुसंगतता हा अबोध मनाचा विशेष नव्हे. स्वप्नगुंफणातल्या पहिल्या तीन प्रक्रिया अबोध मनाशी संबंधित असल्याने त्यांचे स्वरूप बऱ्याच प्रमाणात तर्कविसंगत राहते. बोध मनाला इतकी तर्कविसंगतता खपण्यासारखी नसते. म्हणून अबोध मनाकडून जी मानसिक सामग्री बोध मनाच्या पट्टयात प्रवेश करू लागते ती बोध मनाकडून परत एकदा तर्कसंगत पद्धतीने लावून घेण्याचा प्रयत्न होतो. बोध मन अबोधाकडून आलेल्या या साहित्याला अंतर्गत सुसंगतता तसेच एकूण साहित्याबरोबरची सलगता आणून देण्याचा प्रयत्न करते. अशा प्रकारे स्वप्नाच्या मूळ मसुद्यात बोध मनाच्या Secondary Processes कडून भर घातली जाते. स्वप्नाचा मूळ मसुदा एकूण बोध मनाच्या सोयीप्रमाणे फिरविला जातो. त्यात बाहेरची भर घालण्यात येते आणि एक तर्कसंगत मसुदा म्हणून झोपणाराला तो मसुदा पुरविला जातो. जे दिसते ते आता झोपणाराला स्वस्थ चित्ताने स्वीकारता येत असल्याने तो निर्वेधपणे झोपी जातो. पण का त्या दिसण्यात काही तशाच गफलती राहिल्या असत्या तर त्या गफलतींचा शोध घेण्यासाठी त्याला जागे व्हावे लागले असते, ही जी सगळी वरवरची साफसफाई तिलाच फ्रॉइड मागाहूनचा विस्तार किंवा सेकंडरी इलॅबोरेशन वा सेकंडरी रिव्हिजन-नंतरची दुरुस्ती असे म्हणतो. मनातल्या तपासनीसामुळे ही दुरुस्ती वा हा विस्तार करावा लागतो. हा तपासनीस वाटेल त्या गोष्टींना बोध मनात प्रवेश देत नाही. मनात काय चालले आहे. याच्यावर त्याचे बारीक लक्ष असते आणि मनाच्या कारभाऱ्याला (इगोला) सहज ज्याच्यामुळे मनस्ताप घडणार नाही अशीच सामग्री तो पुढे जाऊ देतो.

फ्रॉइडच्या दृष्टीने स्वप्ने ही मानसिक आजाऱ्यांच्या आजार लक्षणांगत असतात. आजाऱ्याच्या आजाराची लक्षणे त्याच्या हावभावातून, बोलण्याचालण्यातून व्यक्त होतात. तर स्वप्नात स्वप्नदृश्यातून ती व्यक्त होतात.

कारण आजारी हा जसा मानसिक दडपणाखाली वावरत असतो तसाच सर्वसामान्य मनुष्यही मानसिक दडपणाखाली वावरत असतो. मात्र एकाच्या बाबतीत मानसिक दडपण फारच तीव्र असते. तितके ते दुसऱ्याच्या बाबतीत नसते. म्हणून आजारी जागेपणीसुद्धा आजाराची लक्षणे दाखवतो. सामान्य मनुष्य मनाच्या दडपणाची लक्षणे फक्त झोपेत दाखवतो. स्वप्ने आणि आजारपणाच्या मानसलक्षणाना एकाच मापाने मोजण्याचे कारण हे आहे की, दोन्हींचाही उगम अबोध मनाच्या ठिकाणी आहे. ज्या मनोयंत्रणेतून आजारलक्षणाना चालना मिळते त्याच यंत्रणेतून स्वप्नातल्या दृश्यानाही चालना मिळते. मात्र याचा अर्थ स्वप्ने फक्त मानसिक आजाऱ्याना पडतात असा घ्यायचा नाही. स्वप्ने सर्वांना–आबालवृद्ध स्त्रीपुरुषाना पडतात. मग हे आबालवृद्ध स्त्रीपुरुष आजारी असोत वा निरोगी असतो. त्यातील प्रत्येकजण झोपेत स्वप्ने पाहतो.

स्वप्ने आणि आजार लक्षणाना वाट देणारे मनाचे हे भाग कोणते? फ्रॉइड या भागाला अबोध मन किंवा Id असे नाव देतो. आणि या सर्व प्रक्रियेला प्रायमरी प्रोसेस असे म्हणतो. फ्रॉइडच्या मते स्वप्ने म्हणजे आपल्या मनाने आतल्या आत केलेली तडजोड होय. ही तडजोड मनाचा कारभारी आणि कसलाही विधिनिषेध बाळगण्याची इच्छा नसलेले उच्छृंखल अबोध मन या दोघांच्या भांडणातील तडजोड असते. एका बाजूला लोकलाजेस्तव मनाच्या सांदीकोपऱ्यात दाबून ठेवलेल्या आणि आता बाहेर पडू पाहाणाऱ्या नाना प्रकारच्या वासना आणि काही झाले तरी त्याना आहे त्या स्वरूपात बाहेर पडू द्यायचे नाही या निश्चयाने काम करणारा मनोयंत्राचा कारभारी (एजंट) यांच्या भांडणाचा अंतिम व्यक्त परिणाक म्हणजे स्वप्नांची तडजोड. या तडजोडीचे स्वरूप चित्तभ्रमाचे ( hallucination ) असते. जे हवे आहे ते तसेच्या तसे मिळत नाही. मिळणारही नाही. मग ते जणू मिळाले आहे अशी स्वतःच स्वतःची कल्पना करून घ्यायची. स्वप्ने म्हणजे ही काल्पनिक समजूत. ही समजूत करून घेण्यासाठी हवे होते ते सुख मिळाले आहे अशा प्रकारची दृश्ये मनाशी तयार केली जातात. आणि त्यालाच hallucination हे नाव आहे. जबर भूक लागली आहे पण खावयास काही नाही. मग मन मेजवानीवर हात मारत असल्याची स्वप्ने पाडते. वासना त्यांच्या मूळ खऱ्या स्वरूपात मान्य करता येत नाहीत. मग त्यांचा वेष बदलायचा. त्यांना प्रतिकांचे रूप द्यायचे. सभ्य बनवायचे. आणि त्या नव्या सभ्य वेषात त्याना वाट द्यायची. या प्रकारात दोन्ही हेतू साधतात. निषिद्ध वासना बोलून दाखविल्या जातात. आणि

वर परत त्या बोलल्या गेल्या नाहीत अशीही मनाची खात्री ठेवता येते. म्हणजे मनाच्या कारभाऱ्याचेही समाधान आणि वासना मोकळ्या केल्या गेल्याने जेथे त्या दडपण निर्माण करीत होत्या त्याही भागाचे समाधान. स्वप्नांचा आशय वासनातृप्तीचा अर्थ दाखवतो. उलट स्वप्नांतल्या चित्रप्रतिमा वासना बोलल्या गेलेल्याच नाहीत असेही सूचित करतात.

स्वप्नांचा आशय खरोखर वासनातृप्तीचा अर्थ निर्देशित करतो. परंतु हा अर्थ पाहताक्षणी ध्यानात येणार नाही इतका दुर्बोध असतो. कारण मनातल्या ज्या सामग्रीतून हे वासना तृप्तीचे चित्रण केले गेलेले असते त्या सामग्रीत पूर्व तपासनीसाने खूपच बदल करून टाकलेला असतो. फ्रॉइड म्हणतो की प्रौढांच्या स्वप्नातला बराचसा भाग दडपून टाकलेल्या कामवाचक वासनांचा असतो. कामवाचक हा शब्द फ्रॉइडच्या खास अर्थाने घ्यायचा. कामवाचक म्हणजे शारिरीक सुखसंवेदनांच्या इच्छा व्यक्त करणारा. फ्रॉइड आणखी असे म्हणतात की, रात्री झोपेत व्यत्यय येऊन झोपमोड होऊ नये म्हणून स्वप्नांची यंत्रणा काम करते. (मनोरुग्णाचा आजार त्याच्या बाह्य लक्षणात दिसतो. हातून अत्यंत वाईट पाप घडले आहे असे सतत वाटणारा रुग्ण येता जाता तास तास साबणाने हात धूत बसतो. मनावर येणारे दडपण कमी करण्यासाठी त्याच्या शरिराने त्याला दाखवलेला मार्ग म्हणजे हे हातधुणे. – उदा. लेडी मॅकबेथ)

फ्रॉइडनी आणखीही दोन मते मांडले आहेत. फ्रॉइड म्हणतात की, मनोव्यापार दोन वेगवेगळ्या प्रकारे चालतात. एक प्रकारचे मनोव्यापार हे मनाच्या अबोध भागाशी संबंधित असतात. त्यांना ते प्रायमरी प्रोसेस म्हणतात. दुसरा प्रकार बोध किंवा जागेपणातला भागाशी संबंधित असतो, याला ते सेकंडरी प्रोसेस म्हणतात. झोपेत पडणारी स्वप्ने किंवा मनोरुग्णांच्या आजाराची लक्षणे ही प्रायमरी प्रोसेसमध्ये मोडतात. मनोव्यापाराच्या या दोन्ही पद्धती परस्परभिन्न आहेत. स्वप्नपद्धतीत स्वप्नसामग्रीचे संक्षिप्तीकरण फिरवाफिरव, प्रतिकीकरण वगैरे घडविले जाऊन त्या सामग्रीने मूळचे स्वरूप बदलून टाकण्यात येते. दोन, जागेपणी स्थलवाचक कोटींच्या आधारेच मन काम करते. स्वप्नात या कोटींना रजा दिली जाते. तीन, नेहमीच्या व्यवहारात मनोव्यापाराची अंतिम परीणती काहींना काही कृतीमध्ये घडून येते. स्वप्नात आणि मानस आजारात अशी कृती घडत नाही. तर जागृत झालेल्या ऊर्जेचा निचरा करण्यासाठी चित्तभ्रमाच्या पद्धतीचा अवलंब करण्यात येतो. चित्तभ्रमाच्या साहाय्याने तेथे वासनापूर्ती साधण्यात येते.



अनुक्रमणिका



स्वप्नातल्या मनोव्यापाराच्या पद्धतीला फ्रॉइड प्रायमरी प्रोसेस म्हणतात हे वर सांगितलेच. मूल लहान असताना त्याचा सगळा मनोव्यापार या प्राथमिक पद्धतीने चाललेला असतो. मग हळूहळू बोध मन तयार झाले की, त्या मनाच्या आश्रयाने वेगळ्या पद्धतीचा मनोव्यापार सुरू होतो. त्याचे नाव सेकेंडरी प्रोसेस. प्रायमरी प्रोसेसिस ह्या मनातल्या अगदी प्रारंभिच्या कालखंडातील प्रोसेसिस असतात. फ्रॉइड त्यासाठी Primitive किंवा archaic म्हणजे अगदी आधीचे असा शब्द वापरतो. मनोव्यापाराची ही जुन्यातली जुनी आणि पहिली सवय दडपून टाकल्यानंतरच सेकंडरी किंवा दुय्यम पद्धतीचा उगम होतो. ही नवी पद्धती तर्कशास्त्रावर आधारीत असते. तसेच बाहेरच्या जगातल्या कामकाजाशी तिचा संबंध येत असल्याने ती त्या जगाच्या कायद्यांचे मान ठेवून असते. स्वप्ने आणि आजार लक्षणांचा प्रादुर्भाव या दोन गोष्टी म्हणजे प्रायमरी प्रोसेसवर चालणाऱ्या अबोध मनावर लक्ष ठेवणाऱ्या तावेदाराचा ताबा शिथिल झाल्याचा पुरावा होय.

तेव्हा फ्रॉइडच्या दृष्टीने स्वप्ने ही साधीसुधी बाब नव्हे. निदान तत्वत: तरी दुसरी गोष्ट अशी की, फ्रॉइड स्वप्नाना [ events ] किंवा प्रसंग-घटिते मानतात. त्यांच्या दृष्टीने एक स्वप्न म्हणजे एक प्रसंग. दुसरे स्वप्न म्हणजे दुसरा प्रसंग. फ्रॉइडच्या दृष्टीने स्वप्न अखंड पडत नाहीत. तर थोडया थोडया वेळाने पडतात. एक संपले की, काही वेळाने दुसरे पडते वगैरे. (युंगचे स्वप्नांबद्दलचे मत यापेक्षा वेगळे आहे. युंगच्या मते मनुष्य रात्रंदिवस स्वप्ने पाहत असतो. जेव्हा तो जागेपणीचे व्यवहार करीत असतो तेव्हा त्याच्या मनाच्या आत खोल कोठेतरी स्वप्न वा मनोव्यापार सुरुच असतो. युंगच्या प्रतिपादनाचा अर्थ असा की, स्वप्नव्यापा ला युंगच्या दृष्टीने फारसे महत्व नाही. ते ती नेहमीची गोष्ट मानतात आणि दोन, स्वप्नाच्या साहय्याने मनुष्य काल्पनिक इच्छापूर्ती साधतो हे फ्रॉ चे मत त्याना ग्राह्य वाटत नाही. फ्रॉइड स्वप्नाना सुटी घटिते मानतात. याचाच अर्थ असा को, जागेपणीचो मनोव्यापारपद्धती आणि निद्रावस्थे ल मनोव्यापारपद्धती यात फ्रॉइड जाणीवपूर्वक भेद करतात.

Wish-fulfilment Theory फ्रॉइडच्या मते मनुष्याच्या वासना प्रत्यक्षात पुऱ्या होत नाहीत तेव्हा जो त्या पुऱ्या झाल्या आहेत अशा तऱ्हेची स्वप्ने स्वतःला पाडून आवडवळण पुऱ्या करुन घेतो. मनुष्य आपल्या अतृप्त वासना स्वप्नात पुऱ्या करून घेतो याचे स्पष्टीकरण देताना फ्रॉइड सांगतात की, एकतर त्या वासना व्यवहारात कधीच पुऱ्या होऊ शकल्या नसल्या आणि जर त्या पुऱ्या

झाल्या नसत्या वर त्या इसमाला शांतपणे झोप घेता आली नसती. अर्थात ते पुढे असेही सांगतात की, फारच थोड्या अतृप्त इच्छा झोपेत स्वप्नाच्या रूपाने जशाच्या तशा पुऱ्या होतात. भुकेल्या पोटी तुम्ही झोपला तर मेजवानीवर ताव मारीत असल्याचे स्वप्न हा अपवाद झाला. अशी अतृप्त इच्छा स्वप्नात जशीच्या तशी पुरी करणारी स्वप्ने संख्येने अगदी कमी असतात. वरीचशी स्वप्ने ही आडवळणाने अतृप्त इच्छा पुऱ्या झाल्याचे दाखवतात. मनुष्याच्या अनेक वासना निषिद्ध इच्छांशी संबंधित असतात. त्या तो स्वतःशी उघडपणे कधीही कबूल करु शकणार नाही. परंतु याही वासनांना तृप्तीचे समाधान हवे असते. निषिद्ध वासना झोपेतसुद्धा स्वप्नावाटे जशाच्या तशा भागविल्याचे दिसू शकत नाही याचे कारण फ्रॉइड असे देतात की, प्रत्येक मानवी मनामध्ये एक एक तपासनीस काम करीत असतो. हा तपासनीस बोध मनात येणारे सगळे साहित्य नैतिक चाळणीतून प्रथम चाळून पाहातो. व जे त्याच्या पसंतीला उतरले तेच तो पुढे जाऊ देतो. मनात राहून मनाच्या काही भागावर रखवाल-दारी व अंमल चालविणाऱ्या मनाच्या या भागाला फ्रॉइड प्रारंभी सेन्सॉर असा शब्द वापरीत. मागाहून त्यानी त्याचे नामकरण बदलून ते Super-ego असे केले. हा सेन्सॉर मनाच्या प्राथमिक व्यापार व्यवहारांवर लक्ष ठेवतो आणि त्यात जर काही निषिद्ध घटक असले तर त्यांचे रुप लपवून मगच त्याना पुढे किंवा वर, मनात जाऊ देतो.

फ्रॉइडच्या मते प्रत्येक स्वप्न ही एक तडजोड असते. एका बाजूला वर येण्यासाठी जोर करणारी दडपली गेलेली इच्छा आणि दुसऱ्या बाजूला तिच्या खऱ्या स्वरुपात तिला वर यावयास प्रतिबंध करणारा तपासनीस या दोघांच्या भांडणावरील तडजोडरूपी तोड म्हणजे स्वप्न. ( ही इच्छा, समजा अजिबातच वर, बोध मनात येऊ शकली नसती तर तिने झोपणाराला अस्वस्थ बनवून उठविले असते. ) ही तडजोड कशी घडते ? तर त्या अतृप्त पण वर येण्यासाठी उत्सुक असलेल्या इच्छेचा मूळ चेहरामोहरा बदलण्यात येतो व सभ्य चेहऱ्याने तिला बाहेर येऊ दिले जाते. चेहरा पालटल्याने त्या इच्छेचे खरे स्वरुप आणि ( निषिद्ध ) मागणी झोपणाराला चटकन उकलत नाही. आणि एक निरुप-द्रवी दृश्य म्हणून तो ते स्वप्न सहन करतो. अशा प्रकारे निषिद्ध वासना बाहेर पडून तिचा मनावरचा दाब कमी होतो आणि मनाच्या कारभाऱ्यालाही त्याची तोशीस पडत नाही.

आता गंमत अशी आहे की, स्वप्न म्हणजे काही एका अतृप्त पण मनावर दडपण आणणाऱ्या इच्छेचा बदललेला मुखवटा असे जर गृहित धरले तर ती मूळ



अनुक्रमणिका



अतृप्त इच्छा कोठली हे शोधून काढल्यावाचून त्या इच्छेमुळे मनावर येणारे दडपण कायमचे नाहीसे होणार नाही असेही गृहीत धरावे लागते. फ्रॉइड तसेच गृहित धरतात. त्यांचे म्हणणे असे की, स्वप्नांची फोड करून त्या स्वप्नाचा खरा अर्थ शोधला तरच तो त्या स्वप्नाच्या मालकाला फायदेशीर होईल. प्रत्यक्ष स्वप्माने स्वत:चा खरा अर्थ, खरा संदेश मूळ मालकापासून लपवून ठेवलेला असतो. हा अर्थ बाहेर काढण्याचे म्हणजे स्वप्नविश्लेषणाचे एक नवे तंत्रच फ्रॉइड यानी विकसित केले. फ्रॉइड पुढे असे सांगतात की, अशा प्रकारे जेव्हा स्वप्ने फोडून त्यांच्या पाठीमागचा खरा अर्थ शोधून काढला जातो तेव्हा असे दिसून येते की, बरीचशी स्वप्ने ही, त्या स्वप्नाच्या मालकाच्या आत्मप्रतिष्ठेच्या तसेच नैतिकतेच्या कल्पनाना धक्का देणारी असतात. कधी त्या स्वप्नातून त्याचा त्याच्याच आवडत्या माणसांवरचा रोष आणि त्यांच्या मरणाची इच्छा प्रगट होताना दिसते. तर कधी त्यातून व्यभिचार, अगम्यागमन याच्या इच्छा सूचित होतात. तरी कधी स्वप्नाच्या मालकाचा अहंगंड त्यातून दिसून येतो. इत्यादी.

स्वप्ने ही प्राथमिक मनोव्यापारातून पडतात हे वर आपण म्हटलेच आहे. हे मनोव्यापार अबोध असतात. आणि हेच प्राथमिक मनोव्यापार Wish fultulling किंवा काल्पनिक पद्धतीने स्वत:च्या इच्छा पुऱ्या करू पाहाणारे असतात. याच्या उलट दुय्यम मनोव्यापारांचा संबंध बोध मनाशी असतो व ते वास्तवाला धरून चालतात.

अर्थात सगळीच स्वप्ने विश-फुलफिलिंग किंवा काल्पनिक वासनापूर्तीची नसतात. काही Traumatic किंवा धक्का देणारी स्वप्ने असतात तर काही anxiety dreams किंवा धास्ती स्वप्ने असतात. उदा. युध्दात बॉम्बहल्यातून गेलेल्या सैनिकाना युद्ध-मनोविकृती होते. आणि मग रात्रीमागून रात्री त्याना आपण बॉम्बहल्यात सापडलो आहोत हेच एक स्वप्न पडते. हे स्वप्न निश्चितच काल्पनिक वासनापूर्तीच्या स्वप्नांच्या वर्गात बसणार नाही. फ्रॉइडच्या मते मनाला आकस्मिक धक्का देणाऱ्या कोणत्याही प्रसंगामुळे मन कोलमडते आणि मग त्या धक्यातून सावरण्यासाठी व त्या धक्याचा जणू सराव करण्यासाठी तोच तोच प्रसंग पुन्हा पुन्हा मनात आणला जातो. बॉम्बहल्यातला सैनिक बॉम्ब हल्लाला घाबरला होता म्हणून त्याचे मन त्याला तेच तेच दृश्य दर दिवशी दाखवून त्याच्या मनावरचा त्या प्रसंगाचा परिणाम पुसून टाकण्याचा प्रयत्न करीत होते.

याशिवाय Nightmres किंवा दु:स्वप्नांच्या जातीचीही स्वप्ने असतात



अनुक्रमणिका

असे ते म्हणतात या स्वप्नांबद्दल त्यांचे म्हणणे असे आहे की, दडपलेली वासना आणि तपासनीस रखवालदार यांच्यात तडजोड होऊ न शकल्याने दडपलेली वासना जवळपास मूळ स्वरुपात वर येण्याचा प्रसंग उद्‌भवतो आणि मग शेवटच्या क्षणी जागे मन त्या वासनेचे रुपांतर भीती निर्माण करणाऱ्या प्रसंग दृश्यात करते.

स्वप्नगुंफणाच्या स्वरूपाबद्दल फ्रॉइड यांची दोन मते आहेत. एक म्हणजे ते म्हणतात की, स्वप्ने ह्रा जुन्याच साहित्याच्या नव्या जमवाजमवीचा मामला असतो. त्यात कसल्याही प्रकारचे नवनिर्माण असत नाही. जे साहित्य हाताशी असेल त्याचीच काटछाट व ठोकाठोक करून त्यातून स्वप्नदृश्य तयार केले जाते. [ Dream work is absolutely not creative ] आणि दोन स्वप्नाचे मर्म स्वप्नाच्या मागे जो स्वप्नविचार असतो आणि ज्याच्या दाबामुळे ते विशिष्ट स्वप्न फक्त त्याच विशिष्ट प्रकारची कलाटणी व रूप घेते त्या स्वप्न-विचारात नसून त्या स्वप्नाच्या विशिष्ट बांधणीत असते.

स्वप्नात कोठल्याही प्रकारचे नवनिर्माण का असत नाही या आपल्या मुद्याचे स्पष्टीकरण देताना फ्रॉइड असे सांगतात की स्वप्नात जाणीवपूर्वक हेतूने वा योजनेने काहीही घडविले जात नाही. फक्त दृश्य स्वप्नाचाच विचार केल्यास हे मोठे पद्धतशीर व कलात्मक काम होते असे एखाद्याला वाटेल. पण ते खोटे आहे. प्रथम निश्चित हेतू ठरवून कोठलेही स्वप्न तयार होत नाही. तेथे कसलीही उत्स्फूर्तता वा बौद्धिक वापर आढळत नाही. स्वप्ने स्वप्न-विचारांच्या कारणातून पडतात. या स्वप्नविचाराना वाट हवी असते. परंतु हे स्वप्नविचार त्यांच्या मूळ, शुद्ध स्वरूपात स्वप्नात देखील व्यक्त होऊ शकत नाहीत. म्हणून मग ते स्वतःपासच्या स्वप्नाचे साहित्याचा विपर्यास करण्याचा मार्ग पत्करतात. आणि त्या साहित्याचा मूळचा मुखवटा बदलून बाहेर येतात. म्हणून स्वप्ने ही स्वप्नविचारानी पुरविलेल्या मर्यादातच बांधली जाऊ शकतात. या मर्यादा त्यांना मोडता येत नाहीत. ती स्वायत्त नसतात. तसेच ती उत्स्फूर्तही नसतात. प्रच्छन्न स्वप्नविचार हे प्रगट स्वप्नामागचे कच्चे साहित्य होय.

## फ्रॉइड यांची व्यक्तित्वविषयक उपपत्ती.

फ्रॉइडच्या सर्वच विचारांचा परामर्ष घेण्याचे आपणास कारण नाही. आपणास मुख्यतः फ्रॉइडचे विचार समजावून घेताना निर्माणशीलतेसंबंधात फ्रॉइडची भूमिका काय होती हे पहायचे आहे. आणि तो उद्देश डोळ्यासमोर ठेवून आपण फ्रॉइडच्या विचारातील अनेक मुद्दे येथवर तपासले. परंतु हे सर्व







मुद्दे आपण तुकड्या तुकड्याच्या स्वरुपात तपासले. आता हे सर्व तुकडे एकत्रित करुन फ्रॉइडच्या विचाराचे एक संकलित, सलग चित्र तयार करावयास हवे.

फ्रॉइड हा १९ व्या शतकाचे अपत्य आहे. एकोणिसाव्या शतकाला Determinism आणि Positivism किंवा नियतवाद–सगळ्या घटना आधीः पासून नियत झालेल्या असतात आणि प्रत्यक्षज्ञानवाद–विज्ञान जे करील तेच खरे, अधिभौतिकवाद ही शुद्ध फसवणूक आहे, विज्ञानाच्या मदतीने मनुष्याच्या जास्तीत जास्त उद्धार होणार आहे या दोन तत्वज्ञानांचे शतक म्हणतात. फ्रॉइडवर या दोन्ही विचारधारांचा प्रभाव होता. या दोन्ही विचारधारा मानवी पिंडाला एक अत्यंत गुंतागुंतीची ऊर्जा संस्था (energy System) मानतात. या विचारधाराप्रमाणे ही सर्व सृष्टी ऊर्जेपासून बनली आहे आणि मानवी पिंडही त्याला अपवाद नाही. मनुष्ये जे अन्न खातो त्यातून त्याला ही ऊर्जा मिळते; आणि रक्ताभिसरण, श्वसन, स्नायुव्यापार, निरिक्षण, स्मरण, विचार इत्यादी व्यापारातून ही ऊर्जा वापरली जाते. फ्रॉइडवर एकोणिसाव्या शतकाच्या भौतिकवादी विचारसरणीचा जबरदस्त पगडा असल्याने मानवी पिंडाच्या (human organism) बाबतीत वरील विचारसरणीत काही चुकीचे असू शकेल असे त्याला कधीही वाटले नाही. तो ही विचारसरणी यथातथ्य आहे असे धरून स्वतःची विचारसरणी रचित होता. फ्रॉइडला रक्ताभिसरण, श्वसन इत्यादी शारिरीक व्यापारासाठी वापरण्यात येणारी ऊर्जा आणि मनन, स्मरण, विचारण इत्यादी मानसिक व्यापारासाठी वापरली जाणारी ऊर्जा या दोन ऊर्जांमध्ये तत्वतः काही भेद आहे असे वाटत नाही. शारिरीक आणि मानसिक एकाच ऊर्जेचे दोन प्रकार तो समजतो.

एकोणिसाव्या शतकातले वैज्ञानिक ऊर्जेची व्याख्या त्या ऊर्जेच्या कार्याप्रमाणे करतात. फ्रॉइडसुद्धा तेच तत्व चालवतो. म्हणून तो शारिरीक आणि मानसिक असा फरक ऊर्जेत करतो. ऊर्जा प्रकृतिनित्यत्वाच्या सिद्धांताप्रमाणे (Conservation of energy) ऊर्जा आपले स्वरुप पालटते पण कोठल्याही बंद व्यवस्थेत ऊर्जेचा एकूण साठा पहिल्याने असेल तोच राहतो, त्या साठ्याच्या प्रमाणात बदल घडत नाही या सिद्धांताप्रमाणे फ्रॉइड विचार करीत असल्याने तो असे मानतो की, शारिरीक ऊर्जेचे रुपांतर मानसिक आणि मानसिक ऊर्जेचे रुपांतर शारिरीक ऊर्जेत घडू शकते. जेथे या दोन ऊर्जा एकत्र येतात किंवा बदलतात त्या ठिकाणाला तो इड-व्यवस्था असे नाव देतो. इंस्टिक्टस् हे या इडचे पृथक घटक. म्हणजे इंस्टिक्ट आणि इडच्या मध्यस्थीतून मानसिक ऊर्जा शारिरीक वा शारिरीक ऊर्जा मानसिक ऊर्जेत रुपांतरीत होते. इड हा अशा

प्रकारे ऊर्जेचे रुपांतर करण्याचा टप्पा.

फ्राॅइडची मूलभूत भूमिका जीवशास्त्र्याची biologist आहे. मानवी मनाचा विचार करतानादेखिल तो जीवशास्त्राचा आधार कधीही सोडत नाही. त्याच्या एका अलीकडच्या चरित्राचे नावच Biologist of the mind ( F. J. sulloway ) असे आहे.

फ्राॅइडच्या मते मानवी व्यक्तित्वाचे सगळे घटक अंतिमतः मनुष्याच्या जैविकतेमधून उत्पन्न होतात. म्हणून मनुष्याच्याही बाबतीत त्याची जीवरचना आणि त्याचे इंस्टिंक्ट्स ही प्राथमिक वास्तवता. या प्राथमिक वास्तवतेमध्ये फेरफार, विकास वगैरे घडून येतो आणि या विकासातून व्यक्तीचे व्यक्तीमत्व तयार होते. मनुष्याचे सगळे उदात्त विचार, त्याची स्वप्ने ( dreams ) आणि त्याचे कर्तृत्व या सर्वांचा उगम त्याच्या जीवरचनेत आहे. शारिरीक गरजांच्या पूर्तीचा प्रश्न हा मनुष्यासाठी सर्वात महत्वाचा प्रश्न होय. त्याचे कर्तृत्व, त्याचे विचार हे सर्व शारिरीक गरजांच्या पूर्तीच्या प्रश्नाशी निगडित असतात. वर वर पाहाता व्यक्तीमत्व आणि व्यक्तीचे मन आणि तिचा शारिरीक किंवा जैविक पिंड यांच्यातला हा निकट संबंध तत्काळ ध्यानात येणार नाही. परंतू बारकाईने शोध घेतल्यास आणि एखाद्या व्यक्तीच्या बद्दलची सगळी मानसिक शारिरीक माहिती तपासल्यास व त्या माहितीचे व्यवस्थित विश्लेषण केल्यास मनुष्याच्या बाबतीतला मानसिक-जैविक संबंध लगेच उघड होतो. उदा. एका स्त्री पेशंटला दुपारनंतरच्या आंघोळीने कमाल समाधान होत असे. इतर कोठल्याही वेळी तिने आंघोळ केली तरी या आनंदाची सर त्या आनंदाला येत नसे. पुढे सायकोॲनलिस्टाकडे मनोविश्लेषणासाठी ती स्त्री गेली असताना तिच्या बोलण्यात असे आले की, ती तीन एक वर्षांची असताना एकदा तिने घरातली गोंदाची बाटली घेऊन सगळ्या फर्निचरला कागदाचे कपटे चिकटवून ठेवले होते. घरभर गोंद फासून ठेवली होती. जेव्हा तिने हे उद्योग केले तेव्हा तिचे वडील बाहेर गेले होते. वडील दुपारी आले आणि जेव्हा त्यांनी घरभर हा पसारा पाहिला तेव्हा ते आपल्या मुलीच्या अंगावर खूप जोराने ओरडले आणि तिला तावडतोब आंघोळ घालून आण असे ते बायकोला म्हणाले. मात्र मुलीला आंघोळ घालून, पावडर लावून सजवून आणल्यावर वडिलांनी तिचे खूप लाडही केले होते. हा आनंददायक अनुभव त्या पेशंटच्या मनात इतका खोल रुजून बसला होता की, ज्या ज्या वेळी पेशंट दुपारनंतर आंघोळ करी तेव्हा पहिल्या अनुभवातल्या तिच्या सगळ्या सुखसंवेदना पहिल्याच इतक्या तीव्रतेने जाग्या होत.)



अनुक्रमणिका



फ्रॉइडची व्यक्तिमत्वविषयक उपपत्ती hedonistic किंवा सुखतत्ववादी आहे. फ्रॉइड असे गृहीत धरतात की, मनुष्याचे सगळे प्रयत्न दुःख टाळण्यासाठी आणि सुख मिळविण्यासाठी असतात. मनुष्याच्या शारिरीक गरजा पूर्ण झाल्या की, त्याला सुख होते. आणि त्यात व्यत्यय आला की, त्याला त्रास होतो, दुःख होते. सारांश, फ्रॉइडच्या मताप्रमाणे सगळ्या जैविक गरजा भागल्यानंतर शरिराला आणि शरीराबरोबर मनाला जी एक स्वस्थचितत्ता येते ती मिळविण्यासाठी प्रत्येक मनुष्य झटत असतो. स्वस्थचित्ततेची ओढ ही मनुष्याच्या बाबतीतील प्रधान कार्यप्रेरणा ( motive force ) आहे.

शारिरीक गरजा इडमध्ये तयार होतात. आणि इडमधून त्या इगोला जाणवतात. या गरजा वासनांच्या रूपात जाणवतात. इड इंस्टिंक्टचे बनलेले असते. म्हणजेच शरिराच्या आंत जेव्हा कोठे ना कोठे excitation अथवा उद्दिपन तयार होते तेव्हा त्या शारिरीक उद्दिपनाचे somatic excitation चे मानसिक नात्र म्हणजे इंस्टिंक्ट होय अशी इंस्टिंक्टची व्याख्या होते. हे मानसिक नाव ( representation ) अंगभूत असते. दुसऱ्या शब्दात, शरिराला ते नाव काय हे माहित असते. या मानसिक नावाला फ्रॉइड wish किंवा वासना असा शब्द वापरतात, आणि ज्या शारिरीक उत्तेजितावस्थेमधून ( excitation ) ती वासना उद्भवते त्या उत्तेजितावस्थेला ते need अथवा गरज असा शब्द वापरतात. उदा. भुकेची अवस्था घ्या. आता शरिरशास्त्राच्या ( physiological ) शब्दात हीच भुकेची अवस्था मांडून दाखवायची झाल्यास असे म्हणता येईल की, शरिराच्या पेशीमध्ये पोषणविषयक गरज निर्माण झालेली आहे. ही पोषणवाचक गरज मानसिक पातळीवर अन्नाच्या वासनेच्या रूपात प्रतीत होते. या वासनेमुळे ती व्यक्ती कार्यप्रवृत्त होते. म्हणजे अन्नाची वासना ही त्या व्यक्तीसाठी कार्यप्रेरणा असते. भुकेला मनुष्य खाण्यापिण्याचे पदार्थ शोधू लागतो. इंस्टिंक्टस् हे अशा प्रकारे व्यक्तिमत्वामागील प्रेरक घटक असतात. इंस्टिंक्टस् मानवी वर्तन चालवतात (drive) एवढेच नव्हे तर त्या वर्तनाचें वळण कोठले असावे हे सुद्धा ती ठरवतात. त्या वळणांची दिशासुद्धा ठरवतात. ( determine ) दुसऱ्या शब्दात, आपल्या बाबतीत ज्या अनेक चालना ( stimulations ) असू शकतात त्या चालनात इंस्टिंक्टमुळे आपण तरतमभाव करावयास शिकतो. काही विशिष्ट चालनांच्या बाबतीत आपली संवेदनशीलता इंस्टिंक्टमुळे वाढते, तर इतर काहींच्या बाबतीत ती कमी होते. याचा परिणाम आप ल्या चारित्र्यावर किंवा स्वभावधर्मावर आणि आचार व्यवहारावर होतो. अशा प्रकारे इंस्टिंक्टस् आपल्या आचार व्यवहारावर

एक प्रकारचे selective नियंत्रण चालवितात. उदा. भुकेलेल्या मनुष्याला खाद्यपदार्थांचा वास आधी येतो. कामविकाराने उत्तेजित झालेल्या मनुष्यावर लैंगिक चालनेचा प्रभाव आधी चालतो, इत्यादी.

वरील विवेचनावरून एक गोष्ट आपल्या ध्यानात आली असेल. फ्रॉइड ज्या चालनांना ( stimuli ) महत्व देत आहेत त्या चालना आपल्या आत, शरिरातल्या, व्यक्तित्वातल्या चालना आहेत. बाहेरच्या जगातूनही अनेक प्रकारच्या चालना आपल्यावर आक्रमण करतात. परंतु त्यांचा प्रभाव त्या मानाने कमी आहे. विशेषत: व्यक्तिमत्वाच्या गतिशास्त्रात या बाहेरच्या पर्यावरणात्मक चालनांना ते कमी महत्व देतात. त्या मानाने ( iuborn instincts ) ज्यांना फ्रॉइडचा शब्द ट्राएब असा आहे ती जन्मप्राप्त इंस्टिंक्ट फार महत्वाची आहेत. सर्वसाधारणपणे असे म्हणता येईल की, बाह्य चालनांचा व्यक्तिवरचा प्रभाव तेवढासा तीव्र नसतो. आणि त्यांच्याशी जमवून घेताना फारसे जड जात नाही. बाहेरची चालना टाळता येणे शक्य असते. परंतु आतला दाब टाळता येत नाही. फ्रॉइड पर्यावरणात्मक दडपणांना (demands) जरी कमी लेखतात तरी त्यांचे महत्व ते उडवून लावित नाही. काही विशिष्ट परिस्थितीत ही बाह्य दडपणेसुद्धा अत्यंत प्रखर असतात हे ते मान्य करतात. उदा. लहान वयात मुले खूपच कुरवाळली गेली तर त्यांची लैंगिक जागृती वयाच्या मानाने फार आधी होते, शिवाय त्यांच्या मनावर एका अकारण भामनीचे दडपण राहाते.

इंस्टिंक्ट म्हणजे मानसिक ऊर्जेचा एकांक (Quantum). सगळ्या इंस्टिंक्टमधील बेरीज म्हणजे त्या व्यक्तिच्या वापरासाठी उपलब्ध होऊ शकणारी मानसिक ऊर्जा. ही सगळी ऊर्जा इडमध्ये राहाते. किंवा इड हा या ऊर्जेची डोण. किंवा इडला सगळ्या इंस्टिंक्टची बैठकही म्हणता येईल. व्यक्ती जे अनेक मानसिक–शारिरीक व्यापार करते त्या व्यापारांना लागणारी ऊर्जा इडकडून मिळते. इड हा अशा प्रकारे एक डायनामोच म्हणता येईल. आणि हा डायनामो सर्व प्रकारची मानसिक शक्ती पुरवतो. ही शक्ती अर्थात शरिरांतर्गत चयापचयाच्या प्रक्रियेतून निष्पन्न होते.

प्रत्येक इंस्टिंक्टची चार व्यवच्छेदक लक्षणे असतात; १) उत्पत्तिकारण २) प्रयोजन, उद्दिष्ट ३) विषयवस्तू ४) जोर, शारिरीक भूक किंवा गरज म्हणजे उत्पत्तिकारण. उदा. भुकेमुळे (भुकेच्या इंस्टिंक्टने) बेजार झालेल्या इसमाच्या बाबतीत त्याची भूक हे उत्पत्तिकारण. तर ही भूक भागविण्यासाठी पोटभर खाणे मिळविले पाहिजे हा हेतू म्हणजे त्या इंस्टिंक्टचे



अनुक्रमणिका

उद्दिष्ट, भूक भागविली पाहिजे ही इच्छा मनात उत्पन्न झाल्यापासून ते थेट काही ना काही खाणे खाल्ले जाऊन ती भूक शमणे ही सर्व प्रक्रिया विषयवस्तु किंवा ऑब्जेक्ट या नावाखाली पडते. याचाच अर्थ असा की, ऑब्जेक्ट या कोटीत ज्या वस्तुमुळे इंस्टिंक्टचे शमन होणार आहे (येथे भूक हे इंस्टिंक्ट असल्याने खाद्यपदार्थ) एवढीच फक्त वस्तु मोडत नाही. तर इंस्टिंक्टचे समाधान करणारी वस्तु वा परिस्थिती एवढेच नव्हे तर ती वस्तु मिळविण्या-साठी वा परिस्थिती पैदा करण्यासाठी जे काही करावे लागेल ते सर्व ऑब्जे-क्टच्या कोटीत मोडते. उदा. एखादा मनुष्य जेव्हा भुकेलेला असतो तेव्हा ती भूक भागविण्यासाठी त्याला अनेक गोष्टी कराव्या लागतात. अन्न शोधणे, ते मिळविणे व शेवटी ते खाणे. या सर्व गोष्टी ऑब्जेक्टमध्ये मोडतात.

इंस्टिंक्टचा जोर किंवा ताकद हा जोर ती भूक किती तीव्र आहे यावर ठरतो. ती खूप तीव्र असेल तर इंस्टिंक्ट देखिल प्रखर बनेल. भूक खूप वाढली की, भुकेने मनुष्य कासावीस होतो. त्याचे इंस्टिंक्ट त्याला स्वस्थ बसू देईनासे होईल.

फ्रॉइडने मांडलेल्या इंस्टिंक्टच्या मॉडेलकडे पाहाण्यासारखे आहे. फ्रॉइडचे मॉडेल हे ताण आणि ताणाचा निचरा या दोन तत्वांवर बसविलेले मॉडेल आहे. मनुष्याच्या आत काहीतरी चलविचल होते, अस्वस्थता निर्माण होते आणि ज्याक्षणी ती अस्वस्थता कमी करणारी कृती केली जाते त्या क्षणी ती अस्वस्थता कमी होते· internal irritant आंतरिक क्षोभजनक–कारण आणि त्या क्षोभाचे शमन करणारी कारवाई असे हे मॉडेल आहे. एकीकडे अंतस्थ क्षोभ होऊन अस्वस्थता वाढते तर दुसरीकडे तो क्षोभ शमन करण्याची कारवाई घडून तो क्षोभ शमतो. याचा गर्भित अर्थ असा की, इंस्टिंक्टचे उद्दिष्ट हे नेहमी regressive किंवा प्रतिगमनात्मक असते. कारण इंस्टिंक्टमुळे मनुष्य नेहमी त्याच्या मागच्या स्थितीकडे परत येणार असतो. ही स्थिती ते इंस्टिंक्ट जागृत होण्याच्या आधीची स्थिती असते. इंस्टिंक्ट जागे झाल्यानंतरच्या स्थितीशी तुलना करता ही आधीची स्थिती स्थिर किंवा स्वस्थचित्ततेची म्हणता येईल. इंस्टिंक्ट ही conservative असतात किंवा मूळ स्थिती कायम राखू पाहाणारी असतात असेही म्हटले जाते. कारण शरिरामध्ये जी काही अस्वस्थता उत्पन्न झालेली असते ती अस्वस्थता काढून टाकून शरिराची मूळ समतोल स्थिती परत निर्माण करणे हे इंस्टिंक्टचे उद्दिष्ट असते. इंस्टिंक्ट ही अशा प्रकारे एक कायम प्रक्रिया असते असेही म्हणता येईल. एकदा त्यात क्षोभ उत्पन्न होतो. नंतर तो क्षोभ कमी केला जातो. तेव्हा



अनुक्रमणिका

उद्दिपनामुळे सुरू होणारे आणि स्वास्थ्यामध्ये संपणारे असे हे चक्र असते. इंस्टिक्टच्या या अंगाला फ्रॉइड repetition compulsion पुनरावृत्तीची सक्ती असे नाव देतात. क्षोभ आणि क्षोभापासून मुक्तता या एका अखंड चक्रात मनुष्य जन्मभर फिरत असतो. ह्याच शब्द फ्रॉइड विकृत मानसशास्त्राच्या संदर्भातही वापरतात. उदा. आंगठा चोखणारी मुले आपण पाहिली असतील. फ्रॉइडच्या म्हणण्याप्रमाणे दूध आणि तदनुषंगिक समाधानाची अशा मुलांची गरज अपुरी राहिल्याने ती गरज भागविण्यासाठी ही मुले अंगठा तोंडात घालून चोखत बसतात. म्हणजेच विशिष्ट क्रियेमुळे ती विशिष्ट शारिरीक गरज पूर्णांशाने भागली नाही तर तीच क्रिया पुढेही चालू ठेवली जाते. स्तन चोखून पोट (म्हणजे पोटाच्या भुकेच्या आणि मानसिक समाधानाच्या अशा दोन्हीही अर्थांनी) भरले नाही तर स्तन चोखण्याचीच क्रिया अंगठ्याच्या मदतीने मूल पुढे चालविते.

इंस्टिक्टचा सोअर्स किंवा उत्पत्तिस्थान, आणि इंस्टिक्टची विशिष्ट गरज पुरी झाली पाहिजे हे इंस्टिक्टचे उद्दिष्ट, या दोहोत आयुष्यभर बदल होत नाही. एखादे इंस्टिक्ट जेथे तयार झाले असेल तेथेच ते घर करून राहाते. म्हणजेच जी काही गरज शरिरात तयार झाली असेल ती गरज तेथे आयुष्यभर घर करून राहते. ही गरज ताण निर्माण करणारी असते. साहजिकच त्या इंस्टिक्टचा हेतू ताण कमी करून मन:शांती मिळविणे हा असतो. म्हणजेच इंस्टिक्टच्या मूळ जागेप्रमाणेच इंस्टिक्टचे उद्दिष्टही कायम राहाते. मात्र जर का पिंडाची शारिरीक वाढ पुरी झाल्याने इंस्टिक्टचा उगम बदलला वा गाळला गेला तरच काय तो त्यात फेरफार होतो. म्हणजेच इंस्टिक्ट constancy च्या तत्वावर चालतात. शरिराच्या गरजा वाढतात. तसतशी नवी इंस्टिक्ट्स उद्भवतात. मागे कामबाधक इंस्टिक्टच्या अभ्यासाच्या वेळी हे कसे घडते हे आपण समजावून घेतले आहे. इंस्टिक्टचा उगम आणि उद्दिष्ट कायम राहतात तर इंस्टिक्ट संतुष्ट करण्याचे साधन आणि इंस्टिक्ट ज्या वस्तुनी संतुष्ट होते ती वस्तु वा ऑब्जेक्ट बदलतात. दहाव्या वर्षी समजा विशिष्ट साधनामुळे वा विशिष्ट व्यक्ती, वस्तु वगैरेमुळे एखादे इंस्टिक्ट संतुष्ट होत असेल तर विसाव्या वर्षी त्याच साधनानी वा ऑब्जेक्टने ते संतुष्ट होईल असे नाही. इंस्टिक्ट संतुष्ट करणारी साधन आणि ऑब्जेक्ट यात हा बदल घडू शकतो याचे कारण हे आहे की, मानसिक ऊर्जा स्थानांतर करू शकते. समजा जर एका कालखंडात ती एका विशिष्ट ऑब्जेक्टला धरून असेल तर तेथेच ती कायम चिकटून राहू [illegible] तेथून निघून दुसऱ्या [illegible] जाऊ शकते दुसऱ्या ऑब्जेक्टला

धरू शकते. मूल बालपणी आईला धरून असेल. मोठेपणी तेच मूल इतर स्त्री वा पुरूषाला धरून राहील. थोडक्यात मानसिक ऊर्जा अनेक भिन्नभिन्न प्रकारे खर्चिली जाऊ शकते. परिणामतः पहिल्या आवडीचे ऑब्जेक्ट काही कारणाने उपलब्ध नसेल, किंवा ते ऑब्जेक्ट मिळविण्यात काही मानसिक (व्यक्तीमत्व-विषयक) अडचणी येत असतील तर तीच ऊर्जा दुसऱ्या वेगळ्या ऑब्जेक्ट-मध्ये गुंतविली जाऊ शकते समजा हेही ऑब्जेक्ट काही कारणाने हाती येण्या-सारखे नसेल तर पुन्हा तीच ऊर्जा इतर नव्या ऑब्जेक्टमध्ये गुंतविता येईल. असे करत करत हवे ते ऑब्जेक्ट मिळेपर्यंत ती ऊर्जा फिरत राहील. दुसऱ्या शब्दात, एका ऑब्जेक्टची जागा दुसरे ऑब्जेक्ट घेऊ शकते. इंस्टिक्टचे मूळ स्थान आणि उद्दिष्ट यांच्या संबंधात हे म्हणता येणार नाही.

(क्रमशः)

x x x x

प्रत्येक चांगले पुस्तक हे काही खास वाचकासाठी आणि त्याच्याच जातीच्या इतरांसाठी लिहिले गेलेले असते. परंतु त्याचमुळे ते इतर उरलेल्या वाचकांच्या म्हणजे बहुजनसमाजाच्या नाखुषीला कारणीभूत झालेले असते. चांगल्या पुस्तकांचा नावलौकिक मुळातच्या अल्पशा आधाराने उभा असतो आणि तोसुद्धा हळूहळू बांधावा लागलेला असतो.

— दुय्यम दर्जाची आणि बेकार पुस्तके ही दुय्यम दर्जाची आणि बेकार असतात याचे कारणच हे असते की, ती लोकांच्या लोंढ्याला खुलविण्या-साठी लिहिली गेलेली असतात आणि त्यानाच ती खुलवितात.

x x x x

माझ्या शेजाऱ्याचा मात्र अपवाद हो !

माझ्या खांद्यावर चुकीचे डोके बसविले आहे हे मी कबूलच करतो. कारण आयुष्यात मी काय करावे आणि काय करू नये म्हणजे माझे भले होईल हे माझ्यापेक्षा इतरानाच अधिक बरोबर कळते असे दिसते. बिचारा मी मात्र स्वतःला काहीच मदत करू शकत नाही. आपण सगळे दगडी पुतळेच नव्हेत काय ? ज्या पुतळ्यांच्या खांद्यावर चुकीची डोकी बसविली आहेत असे पुतळे. नाही महाराज तुम्ही आमचे शेजारी, तुम्हाला हे मत लागू नाही. तुम्हीच फक्त या नियमाला अपवाद आहात !



अनुक्रमणिका

